


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका








अनुक्रमणिका

भारत सरकारचे १९६५ चे श्रेष्ठता प्रमाणपत्र मिळविणारे एकमेव मराठी मासिक

वर्ष २१ वें
जानेवारी १९६६
मूल्य १ रुपया



# दीपावली

साहित्य * कला * संस्कृति

## श्रेयनामावलि–


- **आम्हीं असें लिहितो :** कादंबरीकार **श्री. ना. पेंडसे** [ मुलाखत–**प्रभाकर अत्रे** ]
- **उसळलें हिमगिरिचें आव्हान :** कु. सुधा **नेरुरकर** ह्यांचें गिर्यारोहणाचे ( सचित्र ) आत्मकथन.
- **चित्रांगदा : रविन्द्रनाथ टागोरांच्या** नाटयाचें रूपांतर – **सौ. मोहिनी वर्दे.**
- **चार कथा :** तो क्षण अमर झाला होता पण.... ( **आम्हीं सात, त्या दोघी – प्र. श्री. नेरुरकर** ) ● अख्खा पगार गेला तरी तो थंडच होता. (**काळ, काम आणि वेग – श्रीराम कामत**) ● नातवाचें मुख पाहून आजी चरकत होती (**शाप – य. दि. फडके**) ● स्वयंपाक झकास झाला (**शोध – वि. रा. भाटकर.**)
- **ललित लेख : प्रेमदेवता ग्रेटा गार्बो – के. टी. देशमुख.**
- **कविता :** वृंदा लिमये, कृ. व. निकुम्ब, सदाशिव करंदीकर, ह. शि. खरात.


शिवाय

दीपमाला, सन्मान पुष्पें, ऐसी अक्षरें रसिकें, पानपुरी वगैरे सदरे, व्यंगचित्रें

आणि

**“ हे उभे आहेत ”** ह्या दिवाळी अंकातील स्पर्धेचा स्फोटक निकाल

**दलाल आर्ट स्टूडिओ, ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४**

Gram : Dalalart
टे. नं. ३५७७६५

● संपादक-मुद्रक-प्रकाशक-मालक श्री. **दीनानाथ दलाल,** दलाल आर्ट स्टुडिओ, ४०–४२, केनेडी ब्रीज, मुंबई ४. या प्रतीस किंमत १ रु. + रजि. पोस्ट ५५ पैसे. वार्षिक वर्गणी, दिवाळी अंकासह रु. १२॥. अंकांत प्रसिद्ध झालेलीं मतें ही चालकांचींहि अधिकृत मतें असतातच असें नाहीं.

Registered with the Registrar of Newspapers For India under No. RN 1612/57
DIPAVALI : Dalal Art Studio, 40-42, Kennedy Bridge, Bombay -4.

अनुक्रमणिका






# दीपावली

## दलाल आर्ट स्टुडिओ

४२, केनेडी ब्रीज, मंबई ४,
टेलिफोन : ३५७७६५
तारेचा पत्ता DALALART

● **वर्गणीदारस सूचना :** दीपावली व सर्व खास अंकसह दीपावलीची वार्षिक वर्गणी रु. १२–५० पैसे. द्वैवार्षिक वर्गणी रु. २०; त्रैवार्षिक वर्गणी रु. २५ व चार वर्षांची वर्गणी रु. ३२. **परदेशीं वार्षिक वर्गणी रु. १६–००**

● **वर्गणी** मनिऑर्डरनें द्यावी. चेक पाठविल्यास तो दलाल आर्ट स्टु डओच्या नांवें, मुंबई बँकेवरचा असावा. इतर ठिकाणच्या बँकेवरचा असल्यास ७५ पैसे वटणावळ जादा पाठवावी. कोणत्याहि महिन्यापासून वर्गणीदार होतां येतें.

● **अंक न पोचल्याचें** कळवावयाचें झाल्यास ५ तारखेपर्यंत वाट पाहून मग कळवावें. अंक ऑफिसमध्यें शिल्लक असल्यास जरूर पाठविला जाईल.

● **जाहिरातींचा व्यवहार** हा परस्पर विश्वासाचा असतो. गिऱ्हाईकांच्या इच्छेनुसार जाहिरात छापण्याची कोशिस करण्यांत येते. तरीहि तांत्रिक अडचणीमुळें अगर अन्य कारणामुळें जाहिरातींत कमी-जास्त फरक झाला तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकावर नाहीं.

● **साहित्याच्या स्वीकृतीचा** निर्णय महिन्याभरांत सामान्यतः कळविला जातो. पोस्टेज असलेलें नापसंत साहित्य परत पाठविलें जातें. पुरेसे पोस्टज नसल्यास तें निकालांत काढलें जाईल.

● **स्वीकृत अगर इतर साहित्य** गहाळ झालें तर त्याची जबावदारी व्यवस्थापकांवर नाहीं.

संपादक, मालक, मुद्रक व प्रकाशक श्री. **दीनानाथ दलाल** यांनीं स्टेट्स पीपल प्रेस, जन्मभूमि भवन, घोगा स्ट्रीट, फोर्ट, मुंबई १ येथें छापून, दलाल आर्ट स्टूडिओ, ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४ येथें प्रसिद्ध केलें.




# फुलवित स्वप्नें नव आशांची आलें संवत्सर

१९६५ साल गेलें. कालपुरुषाच्या कॅलेण्डरमधली ३१ डिसेंबर ही तारीख उलटली गेली. ३६५ दिवसांचा गाडा ओढून दमलेले, भागलेले १९६५ साल युग पुरुषाच्या मांडीवर स्थिरावलें. रक्तानें रंजित झालेले, भारताच्या रणनीतीनें गाजलेले, जवानांच्या पराक्रमानें पुलकित झालेले, ज्ञात अज्ञात नागरिकांच्या धैर्यानें भारावून गेलेले, अस्मितेच्या नव्या आविष्कारानें रोमांचित झालेलें, रण नको म्हणणारे पण लादले गेलेच तर ते स्वीकारण्याची कणखर मानसिक तयारी दर्शविणारे, मृत्यूच्या रडारवर स्वतःला जाळून घेऊन अमर होणारे, असंख्य कसोटयांनीं भरलेले १९६५ साल संपले. पण तें संपले याची खंत मात्र उरीं बाळगण्याचें कारण नाहीं. जगन्नाथाचा हा रथ आहे. अशींच अनेक संवत्सरें आलीं, राहिली आणि कालपुरुषाच्या मांडीवर स्थिरावलीही. जगन्नाथाचा रथ मात्र धांवतो आहे. नवी नवी क्षितिजें ती पायाखालीं घालतो आहे. नव्या उमेदीनें, नव्या उत्साहानें नव्या नव्या आशांची ह्या पृथ्वीवर उधळण करीत आकाश पथांतून तो पळतो आहे. त्याच्या पदाघातानें आकाशांतल्या तारकांची उधळण तो करतो आहे. त्या तारकांची पृथ्वीवर होतात स्वप्नें. पेरलीं जातात तीं असंख्य मनांच्या मातींत आणि मग उभीं राहतात माणसें—जिवंत मनांची, कर्तृत्वाच्या कल्पनेनें भारलेली. कांहीं तरी नवें करण्यासाठीं बद्धपरिकर झालेलीं ! संवत्सरें येतात आणि जातात. स्वप्नांची मोत्यें उधळीत नवें संवत्सर साकारते. तीच तर जगन्नाथानें ह्या सृष्टीवर केलेली संपत्तीची उधळण. त्यांतून घडतें नवें युग ! साकारते नवें जग, उजळतात ज्ञानांची मंदिरें. उभे राहतात कलांचे रंगमहाल, छेडली जाते मनें धुंद करणारी सुरावट आणि थक्क करून जातो एखादा खेमकरणसारखा असामान्य पराक्रम !!

म्हणूनच ह्या जगन्नाथाच्या रथाचें सोत्साह स्वागत करूंया. आकाशपथावरून तो जातो आहे. त्याच्या हातीं ध्वजा आहे उगवतीच्या किरणांची. त्या ध्वजावर धवल अक्षरांत रेखाटले गेले आहे १९६६ हें नवें संवत्सर ! जगन्नाथाच्या एका हातीं आहे शांतीचे कमल आणि दुसऱ्या हातीं आहे संहारक त्रिशूळ ! तिसरा हात पृथ्वीवरच्या पायिकांसाठीं आशिर्वादांची पखरण करीत चालला आहे. आणि चवथ्या हातीं एक पुस्तक आहे. त्या पुस्तकाची सारीं पानें आहेत कोरीं ! साफ कोरीं !! त्यांत लिहिला जाणार आहे तुमच्या आमच्या बऱ्यावाईट कृत्यांचा इतिहास. त्यांत नोंदविली जाणार आहेत नवी मानवी संशोधनें, चंद्रावरच्या त्याच्या नव्या मोहिमा, शांतीचे प्रयत्न, असामान्य कला-निर्मिती, नवें सृजन, नवा पराक्रम आणि नवे विश्वासघातही ! अखेर ह्या पोथीवरची पानें कशीं भरायची हा आहे आपला प्रश्न ! कालपुरुषानें, जगन्नाथानें नव्या वर्षाच्या रूपानें टाकलेला प्रश्न ! अवघें मानवी कर्तृत्व त्याचें उत्तर देणार आहे. आपापली उत्तरें निदान आपल्या पुरती तरी तयार ठेवूं या. कारण ह्या परीक्षेला सूट नाहीं. सिक-नोट चालत नाहीं. दिलीच पाहिजे अशी ही परीक्षा. मग ती उत्तीर्ण व्हायच्या जिद्दीनें तरी देऊं या ! हीं सारीं आव्हानें पचविणारी उमेद आजवरच्या काळांत माणसानें प्रगट केली आहे. आपणही नव्या संवत्सराचे रूपानें कालपुरुषानें दिलेलें हें आव्हान स्वीकारूं या. आलेल्या संवत्सराचे सर्वार्थानें सोनें करूं या. जगन्नाथाच्या ह्या रथोत्सवांत रंगून जाऊं या. झिंगूं या. कारण अशी झिंगच अखेर कांहींतरी नवें, असामान्य 'सृजन' घडवीत असते.

—संपादक

## परिणामकारक व्यंगचित्रें

स. न. वि. वि.

आपल्या "दीपावली"च्या यंदाच्या दिवाळी अंकाबद्दल आपले मन:पूर्वक अभिनंदन करतो. इतका सर्वांगसुंदर, अभिजात साहित्यानें नटलेला व सध्यांच्या महागाईच्या दिवसांत फक्त रु. ३–५० मध्यें मराठी वाचकाच्या हातीं देण्यांत आपण खरोखरच फार उदारपणा दाखविला आहे. वस्तुत: मराठी वाचकांत एका अंकामागे किमान दहा वाचक (व त्यांतील निदान पांचतरी कोणतेच पुस्तक वा मासिक विकत घेण्याचे पाप कधींच न करणारे !) असतात या हिशेबानें आपण "दीपावली" किती लोकांनीं आवडीनें वाचली असेल याचें गणित करालच पण माझ्या मित्रवर्गानें एकमुखानें या अंकाच्या उत्कृष्टतेबद्दल ग्वाही दिली आहे.

यंदाच्या अंकांतील "हीं घरें-तीं घरें" हा "गृहपट" वाचतांना असंख्य आठवणींनीं गुदगुदल्या झाल्या. तथाकथित उच्चभ्रू घरांच्या वागणुकीमुळें उबग आला तर शेवटीं झोंपडपट्टीच्या वास्तव चित्रणामुळें चीडहि (सध्यांच्या परिस्थिती बद्दल, लेखकाबद्दल नव्हे) आली. पु. ल. मनावर घेतील तर एक जबरदस्त प्रभावी नाटक महाराष्ट्रीय वाचकांना व प्रेक्षकांना मिळेल. पहावें विनंति करून त्यांना.

आपल्या कलापूर्ण चित्रांबद्दल आणखी काय लिहावें ?

व्यंगचित्रें खूपच परिणामकारक आहेत, त्यांतले त्यांत महाराष्ट्रीय संपादक वर्गावरील !

पालम विमानतळावर सुचलेले असंख्य विचार, निदान विचारी लोकांना तरी कार्यक्षम करतील अशी आशा वाटते.

एक सामान्य वाचक, सतत दीपावलीचा चाहता, यापेक्षां काय जास्त लिहिणार? याही वर्षी आपणांस श्रेष्ठता प्रमाण-पत्र मिळो.

आपणांस सदैव यश मिळो.

१५५, राशबिहारी ॲव्हेन्यू, आपला,
कलकत्ता २९ ना. दा. पालकर




## "ख्याल" यंदाच्या उत्तम कथांपैकी एक

स. न. वि. वि.

डिसेंबरचा अंक मिळाला. दिवाळी अंकाविषयीं रसिक वाचकांनीं जी दाद पोचविली आहे तिच्यामध्यें एक उणीव खटकली. दिवाळी अंकांतील वामन चोरघडे यांची ख्याल ही कथा आपल्याच दिवाळी अंकांतील असें नव्हे तर इतरही जे हाताच्या बोटांवर मोजतां येणारे छान-छान दिवाळी अंक वाचले त्यांतील उत्तम कथांपैकीं एक आहे. मला स्वत:ला ही कथा अतिशय आवडली. सणाची प्रसन्नता साकार झाली असें वाटलें. ज्या ज्या मित्रांशी दिवाळी अंकाचें बोलणें निघालें त्यांना त्यांना मी ही कथा वाचावयाचा आग्रह केला. चार दोन मैल चालत जाऊन स्वत:च्या पैशांनीं अंक विकत घेतला. तरी पैसे वसूल होतील असें जें आपल्या अंकाचें मोल आहे त्यांत या कथेचाही भाग आहे.

खास व्यंगचित्रांचे असे जे दिवाळी अंक निघाले त्यांतील व्यंगचित्रांहूनही आपलीं चित्रें अधिक बोलकीं आणि समर्थ आहेत. रंगचित्रांविषयीं काय लिहावे?

डिसेंबरच्या अंकांतील ग्रंथ परिचयाचें विस्तारलेलें सदरही लक्षांत आलें. या सदराचा इथपत अथवा याहूनही थोडा अधिक विस्तार नेहमींचा झाला तर तो मासिकाची शोभा वाढवील आणि लेखक वाचकांना रुचेल असें वाटतें. आपला,

मुम्बई आनंद साधले

## एक रमणीय काव्यच

सप्रेम नमस्कार वि. वि.

आपला 'दीपावली' मासिकाचा सर्वांगसुंदर, नयनमनोहर दिवाळी अंक पाहताच नेत्र दिपून गेले नि वाचल्यानंतर संपादकांचे अनुपम कौशल्य, ज्येष्ठ व श्रेष्ठ साहित्यिकांचा साहित्यविलास, संपादकांच्या कुंचल्याची किमया पाहून अत्यानंद झाला. प्रथमदर्शनी संपादकीय वाचताच आपल्या काव्यमय लेखनशैलीची कल्पना आली. 'दीपावली'चा हा दिवाळी अंक म्हणजे एक रमणीय काव्यच? महाराष्ट्रांतीलच नव्हे तर अखंड भारतांतील असंख्य मराठी रसिक वाचकांचा आनंद द्विगुणित करणारे हे पहिलेच मासिक.

साहित्य—कला—संस्कृतीचे खरेखुरे दर्शन 'दीपावली'तून होते. तुमच्या प्रयत्नांचे, कलेचे उत्साहानें कौतुक करणें हें प्रत्येक मराठी रसिक वाचकाचे कर्तव्यच आहे. मला हा अंक फार आवडला. मी 'दीपावली'चा नियमित वाचक आहे. "मला परदेशात भेटलेली अविस्मरणीय स्त्री" ही नाविन्यपूर्ण लेखमाला फारच आवडली. बिगचित्रमालाहि छान वाटल्या. अहो. सारेच सुंदर ! अविस्मरणीय! ! (परदेशात भेटलेल्या स्त्रीप्रमाणे) 'रंगविलासी' चित्रेही आकर्षक आणि दिलखेचक !

असेच उत्तमोत्तम अंक काढून रसिकांचे मनरंजन करावे हीच नम्र प्रार्थना. 'दीपावली'ची उत्तरोत्तर प्रगति होवो.

आपला,

शुक्रवार पेठ सुभाष शां. नाईक
खडक पुणें

## आम्ही असें लिहितों : ७

# सुस्थितीचा आणि सकस साहित्य निर्मितीचा कांहींही संबंध नाहीं

## ................श्री. ना. पेंडसे

[संघर्षांतूनच जीवन फुलते. संघर्षांतूनच कला फुलते. संघर्षातूनच नाटचाचा आविष्कार होतो. असें नेहमींच म्हटलें जाते. पण अशीं फुललेलीं जीवने, अशी बहरलेली कला व असें आविष्कृत झालेलें नाटच प्रत्यक्ष डोळ्यांनीं पाहिलें कीं, मनाला एक आगळाच आनंद मिळतो. तें जीवन पाहतांना, त्या जीवनानें केलेल्या कलेची साधना डोळ्यांखालून घालतांना, त्या जीवनाचे फुलविलेले नाटच रंगमंचावर आविष्कृत होत असतांना कळत नकळत आपणही 'मोठे' होत असतो. जीवनाचे जवळून दर्शन घेऊन आपणही 'ज्ञानी' होत जात असतो. कांहीं नवे पदर ज्ञात होत असतात. चित्त थक्क करून जात असतात.

कादंबरीकार श्री. ना. पेंडसे यांचा माझा परिचय १९५० सालीं झाला. त्यांची एल्गार त्यावेळीं मी वाचलेली होती. त्यानंतरची त्यांची सारी वाङमयीन वाटचालही मी पाहिली आहे. वारंवार आम्हीं एकमेकांना भेटलो आहोंत. पेंडसे परदेशाला जायला निघाले तेव्हां भाऊसाहेब खांडेकरांचे अध्यक्षतेखालीं त्यांचा सत्कार

### मुलाखत—प्रभाकर अत्रे

व निरोप समारंभही मी 'याचि डोळां' पाहिला आणि व्याख्यानाची आमंत्रणें ेंडसे नाकारतात (तेव्हांही नाकारीतच होते) म्हणून आयोजित करण्यांत आलेले चर्चा-मुलाखतींचे कार्यक्रमही मी ऐकलेले आहेत. पण त्यावेळींही पेंडसे ह्या गोष्टींबाबत जसे ओशाळे होते तसेच ते कीर्तिवंत झाल्यावरही अजून ओशाळेच राहिले आहेत असें मला वाटते. शांत साधकाची वृत्ति त्यांची आहे. त्यांचे कलाविश्व हेंही त्यांचे स्वतःचे असें खास विश्व आहे. ती साधना चालू असतांना येणारे मान सन्मान ही एक अपरिहार्य गोष्ट असेल म्हणूनच ती स्वीकारायची एरव्ही पेंडशांना त्यांत खास रस नाहीं. भारतशासनाचें पारितोषिक (अकादमी) मिळाल्यानंतर त्यांच्या कलेचा त्यांच्या कार्यालयाने सत्कार केला (बी. ई. एस्. टी.) आणि त्यानंतर त्यांना डेप्युटी पब्लिक रिलेशन्स ऑफिसर म्हणून बढतीही दिली. पण अशी ही बढती त्या कार्यालयांतील सर्वोच्च ग्रेड देणारी बढती असूनही पेंडसे यांनीं अगदी लेखी नाकारली होती. 'त्यांत मला जास्त गुरफटून घ्यायचे नाहीं.' हीच त्यांची भूमिकाहोती. चाळीस वर्षे पेंडसे मुंबईत व दादरमध्यें आहेत. पण चाळीस वर्षांनंतरहि 'मी इथल्या भूमीशी समरस झालो नाहीं. कदाचित ही कृतघ्नताही असेल पण आपल्याला कोंकणांत जाऊन रहायचं हेंच स्वप्न मी मनांत सतत घोळवीत आलो आहे. देश विदेश पाहून आल्यावर मी कोंकणच्या मातीत जाऊन आलो. तिथें राह्यलो' हें सांगत असतांना जणुं परदेशगमनानंतरच्या 'शुद्धि'ची श्रद्धा त्यांच्या चेहऱ्यावर मला दिसली. १९६२ सालीं बायका मुलांना त्यादृष्टीनें त्यांनीं कोंकणांत पाठविले होते. सौ. पेंडशांनीं शिक्षिकेची नौकरीही तेथें धरली होती. राजिनामा देऊन पेंडसे निघणारहि होते. पण मुंबईत राहून 'सजीव कोंकण साधना'च पेंडशांच्या हातून व्हावी असाच योग असावा. 'रथचक्र' नें तर पेंडशांच्या जीवनाला एक आगळेंच वळण लागलें आहे. कांहींसें शांत, सुस्थिर व आर्थिकदृष्टचा चांगले आयुष्य पेंडशांच्या वांटचाला आलें आहे. पण पेंडशांची सारी कला मात्र कष्टांच्या, विवंचनांच्या, मानसिक ताणांच्या पार्श्वभूमीवर फुलली. ठाण्याचे मो. ह. विद्यालय, म्यु. पल शाळा यांतून शिक्षकी करीत पेंडसे बस कंपनीच्या बिऱ्हाडीं स्थिरावले आणि बसकंपनी आणि नाइट स्कूल असा जीवनाचा गाडा ओढीत त्यांनीं सारी कलेची साधना केली. ह्या साऱ्या व्यापांतून त्यांनी एकाकीपणें केलेली साधना 'कष्टार्जित' आहे. एकलव्याचीही आहे. आणि तरीही पेंडसे असंतुष्ट आहेत. सर्व मानसन्मान मिळूनही असंतुष्ट आहेत. ही गोष्ट मला "पेंडसे संपले नाहींत" (कांहीं जण तसे म्हणतात.) याची ग्वाही देऊन जाते. 'अजून खूप लिहायचंय्. खूप चांगलें लिहायचंय्' ही धारणाच कलावंताला सतत फुलवीत राहूं शकते. 'बन चुके' ही भावना कलेची प्रगती खुंटवून टाकते. पेंडश्यांना ती भावना स्पर्शू शकली नाहीं हें सुचिन्ह ! पेंडसे अजूनही 'शाय' आहेत. चार साहित्यिक जमणार आहेत. गप्पांसाठीं असें कळले तर ते तेथें जाणें टाळतील. पण मित्रांशीं, सुहृदांशीं बोलतांना मात्र ते दिलखुलास आहेत. समोर पानांचा डबा असला. तोंडांत तंबाखूचे पान रंगलेले असले. साहित्यासारखा, नाटकासारखा विषय असला कीं भिंतीवरलें घडचाळ आपोआपच बंद पडते. वेळ केव्हां सरतो तें कळत नाहीं. रंगलेल्या पानानें गप्पाही रंगतात आणि हास्यही रंगते. त्या गप्पांना शांतपणें साथ मिळते सौ. कमलाबाई पेंडशांची, कधीं कधी मुलामुलींचीही ! नवऱ्याच्या वाङमयीन वाटचालींतले सर्व उन्हाळे पावसाळे पचवून, त्याच्या परदेश प्रवासांत व मानसन्मानांतही सौ. पेंडश्यांनीं आपली साक्ष – हंसरी, उमदी साक्ष नोंदविली आहे. त्याचा सार्थ गौरव त्या भाळीं मिरवतांना दिसतात.










अनुक्रमणिका

आपल्या कलासाधनेंत दंग असतांना मात्र ही 'प्रेमळ माणसें' पेंडश्यांना 'सांभाळतात' कारण पेंडशांना फक्त कलाविषयाचीच 'कंपनी' हवी असते हें जाणण्याइतकी तीं सूज्ञ (व सुविद्यही) आहेत. अशा वेळीं पेंडश्यांना हवे असतात फक्त करुण गंभीर संगीताचे सूर ! मग लता मंगेशकरचें गाणें त्यांची साथ करते. "त्या सुरावटीवर मी तरंगतो. लेखनाला गति येते" असं ते म्हणतात. मागें जपानहून आल्यावर त्यांनी टेपरेकॉर्डवर अशीच मंद लयीतल्या संगीताची एक टेप लावली होती. तें संगीतही चालूं होतें आणि आमच्या कलाविषयक गप्पाही ! पेंडशांच्या स्वभावांतला हा गोडवा व हा 'शायनेस'ही मला आवडतो. त्यामुळे पेंडसे हे 'मोठे', असूनही पुन्हां 'आपले' व 'आपल्यांतलेच' आहेत हें जाणवत राहतें. आणि मला वाटतें गेल्या पंधरा वर्षांत ह्याच भावबंधानें त्यांना मला एकत्र बांधून ठेवलें आहे. तेंच पाथेय घेऊन तर मी त्यांना भेटलो. गप्पा सुरूं झाल्या—]



कादंबरीकार श्री. ना. पेंडसे

**प्रश्न** :— आपलें सर्वांत पहिलें प्रसिद्ध-अप्रसिद्ध असें लेखन कोणतें ? त्या लेखनामागील प्रेरणांबद्दल आज कांहीं सांगतां येईल काय ? ती एक निर्मिति आहे याची कांहीं जाणीव होती काय ?

**पेंडसे** :— इंग्रजी ४ थीत असतांना मी **"भाऊचा धक्का ते हर्णै"** असें एक प्रवासवर्णन लिहिलें होतें. शाळेच्या हस्तलिखिता-साठीं म्हणून मी तें लिहिलें होतें. हस्तलिखिताची पानें संपली म्हणून मग तें प्रवासवर्णन अर्धवटच छापले, लिहिले गेले होते हें आठवतें. त्या मागें खास अशा प्रेरणा होत्या असें म्हणतां येणार नाहीं. कोंकणचें मला असलेलें आकर्षण व आपल्याला कांहीं सलग लिहितां येईल काय हें पहावें असे दोन हेतु मनांत असावेत. यापेक्षां कांहीं खास निर्मितीची प्रेरणा वा जाणीव अशी कांहीं त्यांत असेल असें वाटत नाहीं. १९२८ सालची ही गोष्ट आहे.

**प्र.** :—आपल्या लेखनाच्या प्रारंभकालीं आपल्या मनावर पूर्वसूरींचा कांहीं परिणाम झाला किंवा काय ? ग्रंथ वा व्यक्ति ?

**पें.** :—कुणाचाही नाहीं. १९३७ सालीं मी कांहीं व्यक्तिचित्रे लिहिलीं. माझे पूर्वसूरी म्हणजे फडके, खांडेकर हे होत. पण त्यांच्या माझ्या लेखनाची जातच वेगळी होती. माझें वाचन त्या काळांत फार कमी होत असे. आजही ते फार होत आहे असें नाहीं. लेखनालाच आवश्यक तो वेळ खर्च होत असल्यानें साहजिकच वाचनावर परिणाम होतो. त्या काळांत वाचनालयांत जाणें, वाचणें हें अशक्य होते, त्यामुळें वाङ्मयीन जडणघडणीवर परिणाम होण्याचा संभवच नव्हता. माझी लेखन प्रकृती वेगळीच होती. आजही तिचे कुणाशी नातें आहे—पूर्वसुरींपैकीं—असें मला वाटत नाहीं.

**प्र.** :— आपल्या लेखनाची सुरुवात व्यक्तिरेखांपासूनच झाली काय ? व्यक्तिरेखा लिहितांना आपण त्यांच्यावर विस्तार दृष्टया अन्याय करीत आहोंत असें आपणांस त्यावेळीं वाटलें होते काय ? कारण त्यांतूनच आपल्या कांहीं कादंबऱ्यांचा जन्म झालेला दिसतो.

**पें.** :— व्यक्तिरेखांपासूनच झाली. त्याचें चित्रण कांहींसे फोटोग्राफ-सारखेच होतें. व्यक्ति पाहिल्या आणि त्यांचें रेखाटन केलें. तो फॉर्म सोपा वाटला. कल्पनेचा वगैरे फारसा भाग त्यांत नव्हता त्यामुळें तो फॉर्म मी वापरला. यापेक्षां कांहीं वेगळी जाणीव अशी नव्हती. त्यांतल्या दोन व्यक्ति-रेखांनीं मी अधिक भारावून गेलो होतो— एक **'आमचे मास्तर'** व दुसरी **'बापूकाका सामल'** ही होती. त्यांच्यावर मात्र माझें चिंतन चालूं होतें. त्यांच्या चिंतनांतूनच मग माझ्या कादंबऱ्यांचा जन्म झाला.

**प्र.** :— ह्या व्यक्तिचित्रांच्या लेखनानंतर बऱ्याच वर्षांनीं आपण कादंबरी लेखनाला प्रारंभ केलेला दिसतो. मध्यंतरीच्या काळांत आपलें कांहीं चिंतन—मनन चालूं होतें—कांहीं पूर्व तयारी चालूं होती किंवा काय ?

**पें.** :— १९४० ते १९४८ सालापर्यंत माझ्या लेखनांत खंड पडला. 'एल्गार'पर्यंत खास असं लेखन हातून झालं नाहीं. पण



मध्यंतरीच्या काळांत विचार-चिंतन चालूंच होते. वाचन होत होते. तें समाधान देत नव्हतें. 'एल्गार' लिहायला घेतांना कांहीं गोष्टी निषिद्ध म्हणून बाजूला ठेवल्या होत्या. कल्पना स्वच्छ होत्या. धोके ठाऊक झाले होते. व्यक्तिरेखांचा विचार चालूंच होता. कांहीं चांगलें लिहिले जाणें शक्य आहे असें मात्र वाटत होते. पण लेखक वगैरे व्हायचंय्, कादंबरीकार व्हायचंय् ही कल्पनाही मनांत नव्हती. कादंबरी फॉर्मचाही कांहीं विचार एल्गार लिहितांना मनांत नव्हता. सात आठ वर्षे कांहींही न लिहिल्यानें सारं जणुं मनांत सांठत गेलं होतं असं वाटतं. मसाला जमत आलेला होता. एक Healthy approach मिळाला होता. तो म्हणजे मला माणसं आधीं दिसलीं. मग घटना दिसत गेल्या. मी माणसें आधीं Conceive केली. रघु, कादर मला आधीं भेटले. मग घटना आल्या.

प्र:– लेखनाचा Conscious effort केव्हां सुरू झाला? त्यावेळच्या भावस्थितीचें कांहीं वर्णन?

पें:– 'एल्गार'च्या पहिल्या प्रकरणापासून हा आत्मविश्वास जाणवूं लागला. मी कांहीं तरी Conscious effort करतो आहे याची जाणीव मला येत गेली. कांहींतरी चांगले हातून लिहून होते आहे असें मला जाणवूं लागले. एल्गार लिहितांना आपण कादंबरी लिहावी अशी कल्पना नव्हती. पण दीर्घकथा लिहितांना मी जें लेखन केले तें मात्र एका कादंबरीचें लेखन होते. त्या काळांत मी सतत त्या कुटुंबांत वावरत फिरत होतो. माझ्या ह्या activity मध्यें मी एकटा रममाण होतो. दुसऱ्या कुणालाही मी घेऊं शकत नाहीं.

प्र:– आपल्यावर घराण्याचे असें कांहीं वाङ्मयीन संस्कार?

पें:– घराण्याचे असें वाङ्मयीन संस्कार कांहींही नाहीं. आमच्या घराण्यांत वा जवळच्या नात्यागोत्यांत लेखक वगैरे कुणीं नाहीं, त्यामुळें वयाचे पंचविशीपर्यंत खास वाचन वगैरेही माझे कांहीं झालें नाहीं. पण लहानपणापासून साहित्याबद्दल मात्र मला उपजत आवड होती. त्यानंतरच्या काळांतही थोडे फार वाचन मी केले. त्या वाचनाला शिस्त अशी नव्हती व नाहीं. मी जें आयुष्य काढलें त्यांत तें शक्यही नव्हते.

प्र:– घराण्याचे संस्कार नसले तरी त्या जीवनानें मात्र आपल्या वाङ्मयीन संसाराच्या उभारणीला फार मोठी मदत केली आहे असें जाणवते. हें खरें आहे काय?

पें:– माझ्या वाङ्मयीन संसाराच्या भरण–पोषणाला मात्र माझ्या कुटुंबाचा फार उपयोग झाला आहे. माझ्या साहित्यसंसारांतले अनुभव सच्चे आहेत. त्यांतल्या कित्येकांतून मी स्वत: गेलो आहे. माझ्या सर्व लेखनांत माझ्या जीवनांतले कितीतरी अनुभव कलारूप घेऊन उभे राहिले आहेत. त्या दृष्टीनें माझ्या कुटुंबाचा–अनुभवांचा मला फार उपयोग झाला आहे.

प्र:– आपल्या लेखनांत हा अनुभवांचा सच्चेपणा जाणवतो. पण काल्पनिकाचाही कांहीं भाग कलेच्या निर्मितींत असतोच असतो. आपल्या लेखनांतला तो भाग कोणता?

पें:–माझ्या वाङ्मयनिर्मितींत **डोह** ह्या कथेंतील ओहलकाका, **गारंबीचा बापू** मधील **राधा** व **रथचक्र** मधील **कृष्णाबाई** या व्यक्तिरेखा मात्र संपूर्णतया काल्पनिक आहेत. लेखनांतला एक प्रयोग म्हणून मी ते केले. अर्थातच ती राधा वा कृष्णाबाई कुठें नसतीलच असेंही नाहीं. लेखक अखेर बेरीज, वजाबाकी, गुणाकार, भागाकारच करीत असतो. राधा ही संपूर्णतया कल्पनेची निर्मिति आहे असं मी म्हणालो. तेव्हां अमरशेख मला म्हणाला "कोण म्हणतंय् ही कल्पनेची निर्मिति आहे म्हणून? अशी जिवन्त हाडामांसाची राधा मी पाहिली आहे. तिचा माझा परिचय आहे. तिला मी 'गारंबीचा बापू'ची कथा सांगितली तेव्हां तिला फार आश्चर्य वाटलें. लेखकाला पहावें अशी इच्छा तिनें व्यक्त केली. सारें चित्र जणुं तिच्या जीवनावरूनच घेतले आहे असें तिला वाटलें. ती बाई अमराठी आहे. मुंबईत आहे. '**कमल की माँ**' म्हणून आम्हीं तिला ओळखतो असे योगायोग लेखनांत घडतात. माझ्याच नव्हे तर कुणाही लेखकाच्या बाबतींत हें घडूं शकेल."

प्र:– आपलें कांहीं लेखन अजून अप्रकाशित स्वरूपांत आहे काय?

पें:– अप्रकाशित लेखन कांहींही नाहीं.

प्र:– एखादा विषय सुचला तर डायरी, टांचणें वगैरे ठेवतां?

पें:– नाहीं विषय सारे डोक्यांतच घोळत असतात. त्यांचा विचार मी करीतच रहातो.

प्र:– कांहीं विषय त्यामुळें सुटत नाहींत?

पें:– सुटत नाहींत. त्याची कारणें दोन–एक तर मी दररोज डायरी लिहितो. त्यांत मी महत्वाचे चिंतन, कांहीं characters वगैरे तपशीलही नोंदवून ठेवतो. माझ्या नेहमींच्या डायरीत असें कांहींतरी येऊन जातें. दुसरे म्हणजे एकावेळीं मी एकाच विषयांत स्वत:ला Involve करून घेतो. एकाच कादंबरीचा विषय घोळत राहतो. तो त्यांतलीं माणसें, माणसांच्या अनुषंगानें येणाऱ्या घटना यांतच मी गुरफटलेला असतो. त्यामुळें characters miss होत नाहींत.

प्र:– लिहायला बसतांना कादंबरीचा सारा आराखडा तयार करून मग लिहायला बसता किंवा कसे?

पें:– मला मध्यवर्ती व्यक्ति विस्तारानें दिसतात. त्यांचें सारें जीवन–त्यांतल्या महत्त्वाच्या घटना मी conceive करतो. गौण घटना, कमी महत्त्वाच्या व्यक्ति वगैरे गोष्टी लिहितांना सुचत जातात. तो Inner working चा भाग असतो. साधारणपणें त्या त्या व्यक्तीच्या जीवनांत काय काय घडूं शकेल, घडणें शक्य आहे याचा मी मनांत विचार करतो. आराखडा मनांत तयार होत असलाच तर तो फार Broad स्वरूपाचा होत असेल. Sub conscious level वर कदाचित् हें प्लॅनिंग कळत नकळत होत जात असेलही. पण लेखनाची साधारण स्थूल रेषा दिसते सुरुवातीला हेंच खरें.

प्र:– मूळ कल्पनेपेक्षां कांहीं वेगळेंच असें लिहून होते. तक्ता बदलतो. कांहीं नवीं पात्रें येतात वगैरे कधीं घडते काय?

पें:– तसा महत्त्वाचा असा फारसा बदल होत नाहीं. एखाद दुसरें पूर्वी न सुचलेलें मात्र क्वचित् येतेही! 'हत्या'मध्यें वेडा








मालक तसा आलेला आहे हें मला आठवतें. पण Violent changes घडवून आणणारी अशीं पात्रें मात्र भेटलेलीं नाहींत. राधा हें पात्र मला कल्पनेनें Conceive झाले असले तरी बापूचे रिसरेक्शन करणारी बाई मात्र मला आधींच सुचली होती. ती सुचली तेव्हां मात्र मला कांहीं आगळाच आनंद झाला. साधारणपणें Major incidents ठाऊक असतात. शेवट ठाऊक असतो. माझ्या लेखनांत तशा Major उलाढाली बदलेल्या नाहींत. पण गर्भधारणा झाल्यानंतर मात्र लेखकाचें स्वातंत्र्य जातें–मग characters take their own shape असंच घडतं.

प्र:– उदाहरणार्थ ?

पें:– 'गारंबी'ची Press copy तयार करीत असतांना दादरला एका तरुणाचा खून झाला ती वार्ता वाचली–आणि मी अस्वस्थ झालो. हत्याची कल्पना मला जेव्हां सुचली तेव्हां त्याला मवाली करायचा ही मूळ कल्पना. आत्मनिवेदनाचा form घेतल्या बरोबर त्याचा खून आपोआपच गळून पडला. हत्या Develop व्हायला लागला आणि ती कादंबरी माझ्या हातून निसटली. शेवटीं मला कळलें कीं, हत्याचें वाटेल तें होणें शक्य आहे, पण तो मवाली होणें शक्य नाहीं. सारे त्या दृष्टीचे प्रयत्न फुकट गेले. सबंध Conceptions बदलत जातात. लेखक अगतिक बनतो.

प्र.:– आपल्याला विषय सुचतात म्हणजे नेमकें काय होते ? कांहीं कादंबऱ्यांचे विषय कसे सुचले ते सांगा.

पें:– मला विषय सुचत नाहींत, माणसें सुचतात. त्या माणसांत मी स्वतःला गुरफटून घेतो–त्यांच्या जीवनांत कादंबरी घडेल किंवा काय याचा मी विचार करूं लागतो. आणि मग मला माणसांच्या अनुषंगानें घटना सुचतात. 'हत्या' ह्या एकाच कादंबरीबाबत मला विषय 'सुचला' असें म्हणतां येईल. चांगल्या कुटुंबातला एक मुलगा भोंवतींच्या वातावरणामुळें बिघडला व भाऊबीजेच्या दिवशीं त्याचा खून झाला ही वार्ता मी ऐकली आणि मला 'हत्या'चा विषय सुचला. बाकी दिसली तीं माणसें.

प्र:– विषय सुचणें व प्रत्यक्ष लिहिणें या काळांतील आपली वागण्याची पद्धत ? (चिंतन करणें, तपशील ठरविणें, मुद्दे, टिपणें वगैरेबाबत).

पें:– मी Graph काढतो–अर्थातच मनांत ! तीं तीं माणसें जगतील कशी, बोलतील काय, शेवटीं काय घडेल ह्याचा विचार करीत राहतो, लिहितांना Details भरले जातात. लक्ष्य कायम असतें.

प्र:– कादंबरी लेखनाकडे आपण कसें वळलांत ?

पें.:– खरं म्हणजे मी कादंबरीलेखनाकडे वळलोच नाहीं. मी एक दीर्घकथा म्हणून लिहायला घेतली–लिहूं लागलो. पहिलें प्रकरण लिहिलें आणि मग कांहीं वेगळेंच हातून लिहून होत आहे असें जाणवलें. ती कांहीं जाणकार मित्रांनीं वाचली. त्यांत कादंबरीचे गुण आहेत हें त्यांना जाणवले. 'हद्दपार' पासून मात्र मी कादंबरीकडे जाणीवपूर्वक वळलो.

प्र.:– सारें लेखन एक टाकी करतां ? कीं, कांहीं बदल होत राहतात ? नवी नवी भर पडत जाते ?

पें.:– अहो, एक टाकी कसले लेखन होतें ? Page proof झाल्यावरही मी माझ्या लेखनांत Violent changes केले आहेत. मी सारखे बदल करीत राहतो. माझ्या कुठल्याच कादंबरीनें माझें तसें समाधान झालेलें नाहीं.

प्र.:– सर्वांत जास्तीत जास्त वेळ व कमीत कमी वेळ घेतलेली कादंबरी कोणती ?

पें.:– **'रथचक्र'**ला मला अडीच वर्षें लागली. तर **'गारंबीचा बापू'**ची दहा बारा महिन्यांत मी प्रेस कॉपी तयार करूं शकलो.

प्र.:– सर्वांत आल्हादक व कसोटीचे असें कादंबरीलेखन कोणते वाटले ?

पें.:– 'गारंबीचा बापू'चें लेखन मी एका धुंदींत केले. It was a pleasant experience ! पण **'रथचक्र'**चें लेखन मात्र माझी कसोटी पहात होतें. कधींकधीं ४-४ दिवसांत मी चार दोन ओळीं पलिकडे गेलेला नाहीं. (**"तुम्हांला गमंतच दाखवतो"** म्हणून पेंडशांनीं 'रथचक्र' च्या कच्च्या खर्ड्यांच्या वह्या मागवून मला दाखविल्या. त्यांत प्रत्येक दिवशीं तारीख टाकून मग लेखन पुढें चालूं करण्याची त्यांची पद्धत मला दिसून आली. त्यांत कधीं कधीं ३।४ तारखांपुढें








फक्त तीन चार ओळीच लिहिलेल्या आढळल्या, तर कधीं कांहींच सुचले नाहीं म्हणून कांहींशा वैतागानें काढलेली वेगवेगळीं ड्रॉइंग्जही आढळली. '**रथचक्र**' ह्या कादंबरीची त्या त्या वेळीं सुचलेलीं अनेकविध नांवें मला त्यांतच पहायला मिळाली. वाचकांना लेखनाची प्रक्रिया समजून घेण्याचे दृष्टीनें हा तपशील उपयुक्त ठरावा—नांवें—कुंकवाची घग, तिसरा फांसा, सुख पाहतां जवांपाडे, दुःख पर्वताएवढें.)

प्र.:— आपल्या कादंबऱ्या वाचतांना त्यांत वास्तवाचा एक स्पर्श जाणवतो. काल्पनिक आणि वास्तवाचे आपल्या लेखनांतील प्रमाण किती ?

पें.:— खरं म्हणजे प्रत्यक्षांतलेच जीवनानुभव विविध नांवें व रूपें घेऊन माझ्या कादंबऱ्यांत व अन्य लेखनांत आले आहेत—अपवाद—राधा व कृष्णाबाईचाच फक्त !! वास्तवांतून व्यक्ति घेतांना Realism जातां कामा नये असें वाटते Complex working कडे जाण्याचा माझा फार प्रयत्न असतो. 'कलंदर'मधला मोतीराम आवडला म्हणून बरेच लोक सांगतात. पण मला मात्र तो आवडत नाहीं.

प्र.:—आपल्या कादंबऱ्या आपण पुन्हां पुन्हां वाचतां ?

पें.:—पुन्हां पुन्हां वाचतो. आवडतात म्हणून वाचतो. छंद म्हणून वाचतो. सुधारणेच्या संदर्भात वाचतो. हें मी आतां कसें लिहिलें असते असा विचार करूनही वाचतो. त्या साऱ्या वाचनांतून मी खूप शिकलो आहे. शिकतां येते असें मला वाटतें. आज '**गारंबीचा बापू**' ही कादंबरी सुद्धां मी वेगळी लिहिली असती असें मला वाटतें.

प्र. :—'रथचक्र' ह्या कादंबरींत पात्रांचीं नांवे न घालतां आपण संपूर्ण कादंबरी लिहिली आहे. हा प्रयोग आपण जाणीवपूर्वक केलांत ?

पें :— ह्यांत प्रयोग वगैरे करण्याची कल्पना नव्हती. तसा तो खास प्रयोगहि नाहीं. मी लिहीत गेलो. बरेंच लिहून झालें. नांवांमुळें अडलें नाहीं, म्हणून मग पुढें ही दिलीं नाहींत झालं. मुद्दाम प्रयत्न केला नाहीं.



मुलगी पसंत..पण मुलगा म्हणतो फराळाऐवजीं नुसती साखर दिली पाहिजे.

प्र. :— आपल्या वाङ्मयीन संसारांतलें सर्वांत लाडके अपत्य ?

पें.:—अजून जन्मायचं आहे. माझ्या बाबतींत असं सतत होत गेलं आहे कीं, कोठल्याही कादंबरीबाबतची माझी खुषी फार तर वर्षभर टिकली आहे. नंतर मलाच त्या आवडेनाशा झाल्या आहेत.

प्र. :—आपल्या नाटकांत आपल्याला Pleasant writing चें समाधान देणारें नाटक कोणतें ?

पें:—खरं म्हणजे 'महापूर' हें एकच माझें स्वतंत्र नाटक. पण तें नाटक पडलें. यशोदा हें आधी नाटक व मग कादंबरी असें झालें. बाकीची नाटकेंही कादंबरीवरूनच घेतलेली. याचकरितां "गारंबीचा बापू" या नाटकाचे यश जमेत धरूनही मी स्वतःला अजून नाटककार म्हणवून घ्यायला तयार नाहीं. वाङ्मयीनदृष्टच्या श्रेष्ठ नाटक असेल आणि प्रेक्षकच येणार नसतील तर त्या नाटकाला तसा कांहीं अर्थ आहे असें मला वाटत नाहीं. कारण नाटक म्हटलं कीं, प्रेक्षक हा हवाच असें माझें मत आहे. मी त्यासाठीं तडजोड करणार नाहीं—प्रेक्षकांची आराधना करणार नाहीं. करूं नये. पण प्रेक्षक नाटकाचे स्वागत करणार नसतील तर वाङ्मयीनदृष्ट्या श्रेष्ठ नाटक ह्या वाक्याला फार थोडा अर्थ राहतो. नाटक प्रयोगाकरितां असते. त्याच मैदानावर त्याचा कस लागला पाहिजे.

प्र. : व्यक्तिचित्रें लिहिलींत, कादंबऱ्या लिहिल्या पण **लेखन असें केलें** नाहींत !

पें. :— मी दीर्घकथा लिहिल्या आहेत. पण कथा लेखन जमलें नाहीं. जमेलसें वाटत नाहीं. कादंबऱ्यांचे सारांश देणाऱ्या कथा मला देतां येतील असेंच वाटते. प्रयत्न केले आहेत. गाडगीळांच्या कथेचें मला फार आकर्षण आहे.

प्र. :—'एल्गार' ही कादंबरी 'झाली' असें आपण म्हटलें आहे. पण नंतर आपण 'कादंबरी'कडे जाणीवपूर्वक वळलांत. आपल्या ह्या प्रवासांत आपल्या कादंबरीबद्दलच्या कल्पनांत कांहीं फरक पडला काय ?

पें. :— 'गारंबीचा बापू' लिहून होईपर्यंत मी कादंबरीचा विचार असा केला नाहीं. फक्त बहुपदरी व्यक्तिरेखा रेखाटण्याचा माझा प्रयत्न होता. त्यांत एक गैरसमजही होता तो असा कीं, कादंबरीचा Form म्हणून कांहीं विचार केला तर कादंबरी कृत्रिम होईल. आजही असें कधीं कधीं वाटते. पण पूर्वी जसें तो विचार करणें विघातक आहे असें वाटत असे तसें आतां वाटत नाहीं. कांहीं विषय, भावस्थिती (Moods) ना विशिष्ट पद्धतीचीच भाषा—वळणें लागतात ह्या निष्कर्षाप्रत मी आतां आलो आहे. Creative process चा तो एक अविभाज्य भाग वाटतो. भाषा, वगैरे कांहीं वेगळं काढतां येत नाहीं. तें Evolve होत असतें, व्हावें लागते ही जाणीव झाली.

प्र. :—वाङ्मयीन जीवनांतला अत्यंत आनंदाचा क्षण व कसोटीचा क्षण ?

( पृष्ठ ५६ वर पहा )

अनुक्रमणिका



# आम्हीं सात

**—प्रभाकर श्रीधर नेरुरकर**

**तो** अमर क्षण जवळ आला आहे.

आम्ही गोवा मुक्तिपथकाचे सैनिक गोव्याची वाट चालतो आहोंत. वाट तशी आमच्या पायाखालची आहे. पण आज आम्ही ती जपून चालतो आहोंत. ही रात्र म्हटलं तर वैऱ्याची अखेरची रात्र आहे. आम्ही सशस्त्र आहोंत. सात जण आहोंत. शिवाय त्या दोघी आहेत. आम्ही नऊ जण आहोंत. सर्वांनीं 'गोवा कमाण्डो'चा खाकी गणवेष परिधान केला आहे.

मला सर्वांनीं नेता नेमला आहे. पण आजचा क्षण नेतेपणा विसरण्याचा व पुढे सरण्याचा आहे. पण जर का पोर्तुगीज सैनिकांना आमची चाहूल लागली तर मात्र आमची घडगत नाहीं. पण, आत्ता आम्हाला पोर्तुगीज सैनिकांचं भय वाटेनासं झालं आहे! खरं म्हणजे त्यांना आम्ही भ्यालो असतो तर गोव्यांत आम्ही राहीलोच नसतो. अजूनहि हा गोवा पुर्तुगीजांच्या मालकीचा आहे. पण आता पुर्तुगीजांच्या पापाचे घडे भरले आहेत. त्यांच्या राजवटीशी आम्हीं गेली दहा वर्षें या सरहद्दीवर राहून दोन हात करतो आहोत.

आज वाईट वाटतं.

आज माझं पाऊल पुढे पुढेच पणजीच्या दिशेने पडतं आहे हें खरं आहे. पण त्या पावलांचा तरलपणा गेला आहे. पावलं जड झाली आहेत. आमचा त्याग, आमचं शौर्य, आमची एकाकी लढत, आमचे उपास तपास, आमचा आंतून बाहेरून पोर्तुगीज व भारत सरकारकडून झालेला छळ, पोर्तुगीज सैनिकांबरोबरच, गोवा सरहद्दीवरील हिंदी पोलिस राज्याशी आम्हांला करावा लागलेला मुकाबला, या सर्वांचाच उद्या मागमूसही लागणार नाहीं. आमची नामोनिशाणीहि उद्याच्या स्वतंत्र गोमंतकाच्या इतिहासांत दिसणार नाहीं. असा क्षण आला आहे व तो क्षण अमर होणार आहे.

कारण भारतीय सैन्याने अखेर चारी बाजूंनीं गोव्याला वेढा दिला आहे.

रणगाडे, तोफा, मशिनगन्स आणि अधिकारी आणि सैनिकांच्या पलटणी यांचा मुक्काम हद्दी हद्दीवर येऊन थडकला आहे. लढाऊ विमाने आकाशांत दिमाखाने घरघरताहेत आणि रानावनांतून व राजधानींतून आजवर खुशाल असलेल्या पुर्तुगीजांची झोप उडाली आहे. तरीहि आम्ही पणजीच्या दिशेने चालली आहोंत. कदाचित आम्हीं पणजीला पोचण्यापूर्वींच पुर्तुगीजांच्या मुसक्या भारतीय सैन्याने आवळलेल्या असतील.





अनुक्रमणिका

क्षण अमर झाला आहे हे खरं पण आम्हां क्रांतिकारकांना मारून ! आम्हीं आतां जिवंत असून मेलेले ठरणार आहोत—हिरा--हिल्डा--मी--आम्हीं सारेच........

दहा वर्षे! या काळांत कोणकोणते भोग आम्ही या मसणवटीत भोगले नाहींत ? ते आठवलं कीं, मन हळवं बनतं नि धीर खचतो. आयुष्याची दहा वर्षे नुसती तर फुकट घालविली नाहींत ना, असा संभ्रम मनांत निर्माण होतो. ती खंत काळजाला घरे पाडते.

आम्ही सात वेडे आणि त्या दोघी वेड्या पोरी... या क्रांतिकार्यांत अखेरपर्यंत टिकलो. बाकी किती आले, नि गळले, कितीनी विश्वासघात केला, कितीनी तुंवड्या भरल्या नि किती एक प्रत्यक्ष कामाला आले. मार्टिन व बाळा सारखे अजून आग्वादच्या तुरुंगात खितपत पडले आहेत...सारं आठवतं आणि पाऊल कुठेतरी अडखळतं. कितीदां या वाटेने आलो; पण आज अर्धा रस्ता देखील चालून झाला नाहीं आणि किती ठेंचा लागल्या. ठसका दाबून आम्हीं चालतो आहोंत. कारण पुर्तुगीजांना कुठें त्यामुळें आमचा सुगावा लागायचा. मला जिवंत किंवा मेलेला

# आणि त्या दोघी

पकडून देण्यासाठीं त्यांनीं ठेवलेली मोठी रक्कम अजूनहि कुणी तरी अधाशीपणानें मिळवून जायचा....

—कुठवर आलो आहोत आपण ?

—आता आपला पहिला टप्पा जवळ आला आहे, भाई. देऊळ दिसतं आहे. दीपमाळेवर अजूनहि कांहीं दिवे पेटताहेत.

—पुर्तुगीजांच्या पोलिस ठाण्यावर कांहीं दिसतं आहे का, बाबुराव?

—नेहमीसारखंच. काळोख आहे.

—सामसूम आहे...

—किती वाजलेत ?

—मध्यरात्रीला अजून खूप अवकाश आहे....

बाबुराव एका मोठ्या झाडावर चढला आहे आणि आम्ही त्याला खालून विचारतो आहोत व तो आम्हाला विचारतो आहे—

—आणखी किती मैल चालायचं आहे ?

—अठरा तरी मैल...

—अठरा...

दोघींच्याहि आवाजांत कातरपणा आला आहे. त्या प्रथमच एवढं मोठं अंतर चालायला तयार झाल्या आहेत. पुर्तुगीजांच्या पराभवाचे दृश्य त्यांना खुद्द गोव्याच्या राजधानींत जाऊन पहायचे आहे. पहिली हिल्डा. दुसरी हिरा. हिल्डा एकदा पुर्तुगीजांच्या तावडीत सापडली आहे. पुर्तुगीज पोलिस प्रमुखानें तिचे काढायचे ते धिंडवडे काढले आहेत. आग्वादच्या व पणजीच्या पिंजऱ्यांत दोन वर्षे काढून ती सुटून आली होती. बाहेर येतांना तिचा पुर्तुगीजांशी अखेरपर्यंत लढण्याचा निर्धार अधिकच बळावला होता. हिल्डाची कथा गोव्यांत नि गोव्याबाहेरही सर्वांना ठाऊक झाली होती. हिराने मात्र या क्षणापर्यंत पुर्तुगीजांना गुंगारा देण्यांत यश मिळविलं होतं. हिरा एक निर्भय व निर्भीड तरुणी होती. मडगांवला जो पहिला उठाव झाला त्यांत परकरी व शाळकरी असतांनाच तिनें भाग घेतला होता. हिल्डा योगायोगानें लढ्यांत गोंवली गेली होती. मुंबईत चेंबूरीत व ख्याली खुशालीत राहणारी ही सुखवस्तु ख्रिश्चन मुलगी ब्रॅगान्झा डि कुन्हाच्या व्यक्तिमत्वाने प्रभावीत होऊन चळवळीत पडली होती. तिच्या बहिणींनी, भावांनी व आई वडिलांनी तिला वाळीत टाकलं होतं. स्मार्ट दणकट दिसणारी हिल्डा 'कमाण्डो'च्या गणवेषात एखाद्या कमाण्डरसारखी दिसत होती.

आम्हीं चालतो आहोत. गेल्या दहा वर्षांत मी चालायलाच शिकलो आहे. आता ही चाल कदाचित् अखेरचीच आहे व नंतर ती कायमची बंद होणार आहे..

"अरे थांबा... आता रस्ता ओलांडायचा आहे..."

"पुर्तुगीजांची जीप झटकन् यायची...आता थोडक्यासाठीं फार जपलं पाहिजे...

"तें देऊळ गाठायचं आहे..."

"तिथें आज रात्रीचा पहिला टप्पा... जपून..."

"आम्ही सगळे ठीक आहोत भाई, तू पुढे चालतच रहा..."

दुर्गेच्या देवळांत आमचे कांहीं भूमिगत कार्यकर्ते आमची वाट पहात बसले असतील. भटजींची आई स्वयंपाक करून आमची वाट पहात असेल. गेली दहा वर्षे आम्हीं तिच्या हातचं खात आहोत. भूमिगतांना तिनें आपल्या पोटच्या पोरांसारखं वागवलं आहे. म्हातारीने गोवामुक्तीला हातभार लावला आहे. पण तिचा संशय पुर्तुगीजांना अजूनही आलेला नाहीं. आम्हीं तिला 'मदर' म्हणतो. मदर आमची वाट पहात असेल. तिचं क्रान्तिकार्य या लष्करी कारवाईत कुणी कधींतरी मोजणार असेल काय ?

हिरा नि हिल्डाला तिथें ठेवून आम्ही आगेकूच करणार आहोत.

तशा योजनेला त्या नाईलाजाने समंती देताहेत...

पावले झपाझप पडताहेत.

* * *

पिठोरी चांदण्यांत आम्हांला आतां पुढे निघायचं आहे. चार मैलावरच्या पुर्तुगीज क्वार्तेलावर हल्ला चढविण्याचा आमचा बेत कायम झाला आहे. सर्व भूमिगत देवळाच्या पोटघरांत जमले आहेत. मी खिडकीत उभा राहून चांदणं पिऊन घेतो आहे. पाय नि मन दोन्हीं थकली आहेत. वाटतं आहे क्वार्तेलावर आतां हल्ला चढविण्याची काय जरूरी आहे ? आता त्यांना मेल्याहून मेल्या-








सारखं झालं असेल. त्यांना मारून तरी काय होणार आहे ? पण बेत ठरला आहे. बाहेर वातावरण प्रसन्न आहे. आंतही पोटघरांत प्रसन्नतेने खल होत आहेत. माझं मन असंतुष्ट झालं आहे–होत आहे.

हिरा आणि हिल्डा झोपी गेल्या आहेत. मलाहि झोपावेसे वाटते आहे. पण सारे माझ्याकडे पहाताहेत. नेत्याचा हुकूम ऐकायला त्यांची मने आतुर झाली आहेत.

"भाई. . . निघायचं ना ?

"नको. . ." मी जरा दटावूनच बोलतो आहे.

"नको ? . . ."

"आपण आज विश्रांति घेऊं या. . ."

"विश्रांती. . . ?"

"होय. . . विश्रांतीच म्हणतो आहे मी. . ."

"भाई. . ."

"आम्हीं निघणार. . ."

मी गप्पच ! तेवढ्यांत दारावर कुणाची तरी थाप पडते. "कोण आहे ?" हळूंच दार उघडून मदर आंत डोकावून बघते. हळूंच म्हणते.

"ऐका. . ."

"काय 'मदर'. . .

'अरे, तुम्हांला ऐकूं नाहीं आलं वाटतं ? . . .'

मी खिडकीकडे जाऊन बाहेर कान लावतो. मघांची नीरवता भंग पावल्यासारखी वाटते आहे. . . धाड्, धुड, धुडूम, धडाम्. . . आवाज अस्पष्ट ऐकूं येत आहेत. सारं रान हादरल्यासारखं वाटतं आहे.

'ऐकलंस ? . . .' मदर. . .

'हुं. . .'




गोड सोडून दुसरं कांहींहि चालेल, कारण मला डायबिटीस आहे

सारे माझ्याभोवती गोळा झाले आहेत. खिडकीवर एकच झुंबड माजली आहे. चांदणंसुद्धां कसं पेटल्यासारखं भासत आहे. सर्वांचे डोळे एकमेकांच्या डोळ्यांशीं बोलताहेत. प्रत्येकांचे काळीज जणु ओठावर आलं आहे. आणि तरीहि कोणतीतरी अनामिक चिंता, हुरहूर, भीति काळजाचा ठाव घेत आहे. म्हणजे माझा तर्क अखेर खरा ठरला आहे. लष्करी कारवाईला सुरुवात झाली आहे. . .

"किती वाजले ? . . ."

'बारा. . .'

"आतां पुढें काय करायचं. . . भाई. . . !" सारे विचारताहेत...

"निघायचं. . ." मी.

"कुठें ? . . ."

'क्वार्टेलावर भारतीय सैन्य आंत येण्यापूर्वी अखेरचा हल्ला चढवायचा आहे. . . एका तुकडीने तांतडीने म्हापशांत जायचं आहे. . . वास्कोडीगामाचा पुतळा रात्रींच्या रात्रींत उडवून यायचा आहे. . . दुसरीनं. . .

धडाड् धुम्. . . धुम्. . . धड धड. . .

तोफांचे आवाज आतां स्पष्ट ऐकू येत आहेत . . .

* * *

पुन्हां आम्हीं पाऊल पुढें टाकलं आहे. निघण्यापूर्वी आम्हीं दुर्गेला आणि 'मदर' ला वंदन केलं आहे; आतां आम्हांला निघालंच पाहिजे. हीच आमची अखेरची भूमिगत कारवाई ठरणार आहे. पुर्तुगीज पोलिस चौकीवर हल्ला करून ती ताब्यांत घ्यायची आहे. मिळतील त्या पुर्तुगीजांना गिरफदार करायचे–भारतीय सैन्याच्या हवाली करायचे. . . कदाचित् आज पुर्तुगीज लोक निकराने लढतील. मला राहून राहून वाटतं आहे कीं, आपल्याला त्यांच्याशी लढतांना मरण यावं. . . मरणाला निर्भयपणानें मिठी मारण्याचं नीतीधैर्य मला लाभावं. . . आज मला मरण व जीवन दोन्हींही सारखीच वाटताहेत. . . कितीदा मरणांतून वांचलो आहे. . आणि जे मेले, मारतां मारतां मेले, त्या कॉम्रेड्सचे चेहरे या क्षणाला जिवंतपणें आठवताहेत. . .

आतां स्वतंत्र गोव्यांत आम्ही जगणार आहोत. हे आतां निश्चित झालं आहे. आतां वनवास, सरहद्दीवरल्या त्या एकाकी भयाण घरकुलांत भुताखेतासारखं जगणं नी धडपडणं आतां संपुष्टांत येणार आहे.

मग हिल्डा कुठे जाईल ?

हिराचं काय होईल ?

इथवर एका कुटुंबासारखे राहिलेले आम्हीं क्रांतिकारक–नंतर काय होईल आमचं ? आम्हीं पाहिलेली व जोपासलेली मुक्त गोमंतकांची स्वप्नें साकार होणार आहेत कां ? भारत सरकार पुर्तुगीजांना निमूटपणानें जाऊं देईल ? लिस्बनच्या तुरुंगांत डांबलेल्या कॉम्रेड्सना भारत सरकार सोडवून आणणार कां ? ह्या लष्करी चढाईची आंतरराष्ट्रीय प्रतिक्रिया काय होणार ? दूर पोर्तुगीजांशी लढणाऱ्या अंगोल्यांतील क्रांतिकारकांना ही वार्ता ऐकून





काय वाटेल ? आतां आग्वादच्या तुरुंगांतून सर्व राजबंदी बाहेर पडतील. आमचा खंदा नेता, पहिला सत्याग्रही, मार्टीन फर्नांडीस गेली सात वर्षे आग्वादच्या तुरुंगांत खितपत पडला आहे. तो उद्यां सुटेल. . . त्याचं नांव साऱ्या भारताला ठाऊक झालं आहे. त्याचा त्याग, सत्यनिष्ठा, करारीपणा, पुरोगामी दृष्टी, आणि पुर्तु-गीज अधिकाऱ्यांनीं सुद्धां त्याच्याबद्दल काढलेले आदराचे उद्गार. . . .

आम्हीं उगाचच खोटीं स्वप्नें पहात होतो. गोव्याची जनता खवळून उठेल. क्रांतीचा रौद्रभीषण उठाव होईल. बॅस्टीलच्या तुरुंगासारखा आग्वादचा किल्ला ताब्यांत घेतला जाईल. रॉबेस्पी-भरसारखीच पुर्तुगीज गव्हर्नर जनरलची कॅंडीलॅक रस्त्यांत अड-विली जाईल व त्या अल्बुकर्कच्या व सालाझारच्या अखेरच्या हस्तकाचं रक्त लोक ओंजळी भरभरून घेतील व क्रांति उन्मा-दानें घटाघट पितील...

पण तसं कांहींच घडलं नाहीं. आणखी कित्येक वर्षे घडलंही नसतं.

आम्ही डोंगर चढतो, उतरतो आहोंत. पोर्तुगीजांचं पोलिस ठाणं हाकेच्या अंतरावर आलं आहे. मी मार्गदर्शन करतो आहे. आम्हीं ठाण्यावर हल्ला करणार आहोत.

हिरा नी हिल्डा जमिनीवर अंग टाकताच निद्राधीन झाल्या होत्या.

'उठवायचं का रे त्यांना . . .' मदर

मी म्हटलं होतं . . . "झोपूं दे त्यांना . . ."

आज कित्येक वर्षे आम्हीं एकत्र होतो. भावाबहिणी-सारखे वनवासांतहि नांदलो होतो. त्या दोघींच्या सहनशीलतेला मर्यादा नव्हत्या नि प्रेमाला अंत नव्हता—आतां आमच्या फारकतीचा क्षण जवळ येत चालला होता. जवळ आलाच होता.

★ ★ ★

तोफांचा धूमधडाका वाढतो आहे. डोंगरावरून दूरवर आम्हांला आगीचे लोळ लळाळत जातांना दिसले देखील. आकाशांत विमानांची घरघर सुरू झाली आहे. . . लष्कराने बरंच अंतर कापलेलं दिसतं आहे.

पोर्तुगीज ठाणं आमच्या झेपेत आलं आहे. ते ओढ्याच्या दुसऱ्या कांठावर आहे. आम्ही पहिल्या काठावर आहोंत. पण सारं साम-सूम आहे. आम्ही सातही जण जमिनीवर घट्ट पाय रोवून उभे आहोत. आमची शस्त्रं आम्हीं सरसावली आहेत. . . . दबा धरून बसलो आहोंत. नेहमींच्या सराईतपणें बाबूराव झाडावर चढला आहे. . . हळू मंद आवाजांत तो आम्हांला सांगतो आहे कीं, तें ठाणें निर्मनुष्य झाले आहे. तेथील पुर्तुगीजांनीं पोबारा केला असावा. "कुणी गोळी घालूं नका, हॅण्डग्रेनेड फेकूं नका, थांबा," तो वरूनच आम्हांला इशारा देतो आहे.

म्हणजे पुर्तुगीज शिपायांना पळून येण्याचा हुकूम पणजीहून मिळाला आहे तर !

लष्करी कारवाईचा मंत्र इथें लागूं पडला आहे.

बाबूराव खालीं उतरला आहे व आम्हीं दबकत, ओढा ओलांडला आहे. आमची पावलें पोर्तुगीजांच्या ठाण्यांत पडली आहेत. खरोखरच तिथें कुणीही नाहीं.







"व्हिवा पुर्तुगाल. . ." मायकेल...

"व्हिव् गोवा. . . ." पंढरी त्याला उलटी प्रतिसाद देतो आहे. . .

"अरे, सामानदेखील न घेतां पळून गेले आहेत. . ." कृष्णा ओरडतो आहे.

"पुर्तुगीज मुर्दाबाद. . . अरे, गोवा स्वतंत्र झाला आहे. . . सालाझार संपला आहे. . . दुर्गा भवानीचा जय झाला आहे. . ."

"सलाझार मुर्दाबाद. . .गोवा झिंदाबाद. . ." पुन्हां घोषणा उठल्या. हवेत कुणीतरी गोळीबार केला. पण कुठून प्रतिसाद नाहीं. कांहीं नाहीं. मलाही नशा चढायला लागली आहे. त्या ठाण्याचा कबजा घेऊन आम्हीं खोली न् खोली धुंडाळतो आहोत. दिवे पेटले आहेत. पुर्तुगीजांनीं टाकून दिलेल्या बॅटऱ्या पेटल्या आहेत. ओह...! आम्हीं अलीबाबाच्या गुहेंत तर शिरलेलो नाहीं ना? . . . किती सूट केसेस्. . . रेकॉर्ड प्लेअर्स, ट्रॅन्झिस्टर्स, कॅमेरे, बंदुका, फर्निचर, खाद्य पदार्थ, उंची उंची परदेशी मद्याच्या रंगी बेरंगी बाटल्या...उंची सूट, फोटो आल्बम्, अर्धवट जळलेले कागदपत्र, पत्रें, नग्न स्त्रियांची उत्तान चित्रें, खोलीच्या मध्यभागीं बसविलेली सालाझारची तसबीर, फाऊंटन पेनें, हातमोजे, सिगरेट्स्, आणखीं कितीतरी. . .

बाकीच्या सहा जणांचा ताळतंत्र सुटायला सुरुवात झाली आहे. . .

मद्याच्या बाटल्या फुटताहेत आणि रिकाम्या होत आहेत.

मी ओरडून जरब बसविण्याचा प्रयत्न करतो आहे. कुणी माझा आवाज ऐकत नाहीं व कुणी ऐकावा असेंही मला वाटेनासे झाले आहे. . . . !

मी एका छानदार खुर्चीवर बसलो आहे. समोर सुंदर टेबल आहे. टेबलावर दोनचार अर्धवट लिहून ठेवलेली पुर्तुगीज भाषेंतील पत्रे आहेत. समोरच टेबल लॅम्प भळभळ पेटतो आहे. पत्रे वाचण्याचा मोह मला आवरेनासा झाला आहे...मी पहिलं पत्र दिव्यावर धरून वाचतो आहे. . .

पुर्तुगालमधील आपल्या प्रेयसीला लिहिलेले तें पत्र आहे. ते तिला कधींच न मिळणारे. . .'प्रिय. . . .' लिहिणाऱ्यानें लिहिलें आहे. "झालं संपलं. आमचं गोव्यांतील वास्तव्य आतां संपल्यातच जमा केलं पाहिजे. कालच हुकूम आले आहेत. सर्वांनीं पणजीत जमायचं आहे. भारताने लष्करी कारवाई सुरू केली आहे. माझ्या प्रिये. . .आतां मी लवकरच तुला भेटणार आहे...मी या जंगलांत रहातो आहे; तूं स्वर्गलोकांत रहाते आहेस. माझी आठवण तरी येत होती कां? कां कुणी दुसरा एव्हांना गांठून मला विसरलीस तर नाहीं ना? . . .तुझ्यासाठीं मी काय आणूं शकतो याचा मी विचार करतो आहे; पण. . . ."

पत्र अर्धवटच राहिलं होते. मला तें वाचवेनासे झाले होते. . . पुढ्यांत पडलेल्या इतर पत्रांकडे माझा हात जातच नाहीं. मला पुर्तुगीज सैनिकांची कींव यायला लागली आहे; आमचा झगडा त्यांच्याशी नव्हता: त्यांना गुलाम करून दूर वसाहतींत आपले हुकूम कुत्र्याप्रमाणें पाळायला लावणाऱ्या एका दुष्ट राजवटीशी व राजकीय तत्त्वज्ञानाशी तो लढा होता. . .

मी उठतो नि सर्वांना पूर्वीच्या जरबेनें हुकूम करतो. . .

"तुम्हीं हवे तर मद्य पिऊन घ्या. हवे तितके प्या. वस्तु तशाच राहूं द्या. . ."

बाबूराव पिऊन तर्र झाला आहे. त्यानं दोन तीन कॅमेरे गळ्यांत अडकवले आहेत. . .एक दोन ट्रॅन्झिस्टर्स हातात उचलून घेतले आहेत. तो वाटेल तसा गातो आणि नाचतो आहे. बाकींच्या पांचाची पण कमी अधिक तीच अवस्था झाली आहे. . .

"आपले काम झालेले आहे. . ." मी पुनः हुकूम देतो.

"मागे फिरा. देवळांत जाऊन आपल्याला उद्याचे बेत आखायचे आहेत. . ."

रात्रीचे दोन वाजून गेले आहेत. झकास चांदणं पडलं आहे. हवेंत गारवा आला आहे. भारतीय इतिहासाने एक नवें पान पाहिले आहे. तोफांचे आवाज ऐकूं येत आहेत. . .

निघतांना मी पण एक पुर्तुगीज बिअरची बाटली तोंडाला लावली आहे.

आम्हीं दुर्गेच्या मंदिराकडे पावलें वळवली आहेत.

बाबूरावाचा मद्याचा कैफ चढतच चालला आहे. उतरणीला त्याला दोन्हीं बाजूंनीं धरून खालीं न्यावा लागत आहे. तो गाणं गातो आहे. ताळतंत्र नसलेले! आणि तरीहि त्याच्या गाण्यांत मला केवढा मोठा अर्थ भरून राहिलेला दिसतो आहे. . .

शारीरिक थकवा दूर पळाला आहे. पण मानसिक थकवा पुन्हां एकदां जोर करणार, अशी चिन्हें दिसताहेत. मला म्हटले तर स्वातंत्र्याच्या जाणीवेची एक निराळीच नशा चढते आहे आणि त्याच पावली तीं चढेनाशी पण होते आहे. . .रात्र वर वर चढते आहे. . . माझ्या डोळ्यासमोर माझ्या आयुष्याची गेली दहा वर्षें रंगीबेरंगी चित्रपटाप्रमाणें झराझरा सरकत आहेत. आमचं कार्य संपलं आहे.

वयाच्या पंचवीसाव्या वर्षी मी या क्रांतिकार्यांत उडी घातली. मार्टीननें मला हा क्रांतीचा मंत्र दिला होता. मी माझी एका मोठ्या कंपनीतील चित्रकाराची नोकरी सोडून या लढ्यांत उतरलो होतो. तेरेखोल नदीच्या कांठावर एका बेवारशी स्मशानवटींत, लोकांनीं टाकून दिलेल्या एका घरांत आम्हीं आमचा तळ ठोकला होता. तें सरहद्दीपासून जितकं जवळ तितकंच गांवापासून दूर होतं. वाघासारखे आकाळ विकाळ असे आमचे जिमी व जॅकी कुत्रे आमच्या बाजूला कुणाला फिरकू देत नसत. कुणी कामावांचून तिकडे फिरकतही नसे. मधून मधून भारतीय पुलिसांचा ससेमिरा आमच्या मागे लागायचा. . .घर तसं चांगलं होतं. तिथूनच आम्ही आमचें 'आग' हे साप्ताहिक पत्र सायक्लोस्टाईल करून काढीत असूं. माझी व्यंगचित्रे व माझं पुर्तुगीज भाषांतर असे. कोंकणी, मराठी, इंग्रजी व पुर्तुगीज भाषेंत आमचा चार पानी अंक नियमित निघत असे. हिल्डा इंग्रजी संपादन करी तर हिराने कोंकणी



अनुक्रमणिका

व मराठी बाजू संभाळली होती. गनिमी लढ्यांचं शिक्षणहि आम्हीं त्या परड्यांतच घेत असू व नव्या नव्या उमेदवारांना देत असू. . .

आशा निराशेचे खेळ सदैव आमच्या जीवनांत चाललेले असत.

मध्यंतरी अखिल भारतीय जनता आमच्या लढ्यांत सामील झाली. हजारो सत्याग्रही हद्दीवर येऊन सत्याग्रह करूं लागले. चळवळीला उग्र रूप आल्यासारखे वाटलें. पुर्तुगीजांची आतां उचल-बांगडी होणार असें वाटू लागले. . . पण कुठे काय? आमच्या ठाण्या-पासून जवळच्याच पुर्तुगीज नाक्यावर पांच सत्याग्रहीना पुर्तुगीजांनीं गोळ्या घालून कुत्र्यामांजरासारखं ठार मारलं होतं. आणि उन्मत्त-पणानें ते हंसले होते. . . नाचले होते . . . आणि बंदुका सरसावून हद्दीवर मार्गे हटलेल्या सत्याग्रहीच्या जथ्याला भेडसावीत होतं. . .

गेल्याच वर्षी त्यांच्या आसुरी कृत्याचा सूड आम्हीं अखेरीस घेतला होता.

त्या ठाण्यावर रात्रीं हल्ला करून तेथील सर्वच्या सर्व पुर्तुगीज सैनिकांना आम्हीं कंठस्नान घातलं होतं. आमच्या दहा वर्षांच्या भूमिगत कार्यातील तो भीषण हल्ला होता. त्यानंतर भारत सर-कार हडबडून जागं झालं होतं. सीमेवर कांहीं क्रांतिकारक जागृत आहेत याची दखल दिल्लीला देखील घ्यावी लागली होती. . . चक्रं हलूं लागली होती.

तळघरांत दडून राहिलेल्या एका पोरसवदा पुर्तुगीज सैनिकाला कुणीतरी खेचून माझ्याकडे आणले होते. मला त्याची दया येत होती व रागही येत होता... तो पुर्तुगीज भाषेंत बोलत होता; आपल्याला जीवदान देण्याची तो भीक मागत होता. पुर्तुगालमधील आपल्या म्हाताऱ्या आईची व तरुण बहिणीची आण तो आम्हांला घालीत होता. आपल्याला जबरदस्तीने इथें आणण्यांत आलं आहे असं सांगत होता. रडत होता. पण त्याला जीवदान देण्यांत धोका होता असंच सर्वांचं मत पडलं होतं व मी निर्णय देण्यापूर्वीच कुणाच्यातरी गोळीला तो बळी पडला होता. आमचे हात रक्ताने बरबटलेले होते. तें क्रांतीचं रक्त होतं. गोव्याची क्रांतिदेवता आसुरांच्या रक्तात न्हाऊन निघाली होती... तोच आमचा शेवटचा उठाव होता. त्यानंतर लवकरच भारत सरकारचं लष्करी नियंत्रण सरहद्दीवर सुरूं झालं होतं. आमच्या कार्याला खीळ पडली होती...

* * *

आम्ही पुन्हां दुर्गेच्या देवळांत आलो आहोंत.

भटजींनीं देवळांत दिव्यांचा लखलखाट केला आहे.

मदर उभी आहे. व हिरा व हिल्डा प्रवेशद्वारांत पंचारती घेऊन उभ्या आहेत. रात्रीचा पुरुषी वेष त्यांनीं टाकून दिला आहे. दोघीहि साड्या नेसल्या आहेत. दोघींच्याहि कपाळावर कुंकवाचा टिळा आहे. आम्हांला त्या सामोऱ्या येताहेत.

"भाई. . . . " त्या दोघी एकदम हर्षभराने ओरडतात.

मलाही शब्द सुचेनासे झाले आहेत.

हिल्डाने सहन केलेल्या यमयातना आठवून माझा कंठ दाटून आला आहे.

हिराच्या पणतीसारख्या त्यागानें माझे डोळे पाणावले आहेत.

मदर डोक्यावर पदर घेऊन कुणा गूढ अबोल नियतीसारखी त्यांच्या मागे उभी आहे म्हटली तर ती पण हर्षित झाली आहे; म्हटली तर गंभीर दिसते आहे. गूढ भासते आहे.

त्या दोघींनी प्रथम मला ओवाळलं आहे.

माझ्या ख्रिश्चन कपाळाला गंधाचा व कुंकवाचा टिळा लावला आहे...

त्या सर्वांना ओवाळताहेत...

दोघींच्याही डोळ्यांतून आनंद दुःखाचे संमिश्र अश्रु डोळे भरभरून वहाताहेत...

कुणी कुणाची आंसवं पुसायची हा प्रश्न आहे!

पहांट होत आली आहे...

आणि बाबूराव झिंगत झिंगत देवळाच्या आवारांत लटपटत गेला आहे आणि नगारखान्यांत जाऊन त्याने नगारा बडवायला सुरुवात केली आहे...

तो नगारा बडवतोच आहे. आणखी कुणीतरी त्याच्या मागून तिथें गेले आहेत..

आजची सकाळची नौबत आडदांडपणें आमच्यापैकीं चार पांच जणांनीं सुरू केली आहे...

नगारा झडतो आहे.

"चला, आता दुर्गेची आरती करूं या" मदर म्हणते आहे...

हिरा कवयित्री आहे. कसली तरी गुणगुण तिनें सुरूं केली आहे.

"काय ग ?... गाणं बिणं सुचलं कीं काय ?..." हिल्डा तिच्या खांद्यांना हालवून विचारते आहे.

"हुं..."

"म्हण तरी..."

"क्षण अमर झाला आहे..." ती आपली पहिलीच ओळ म्हणून दाखविते.

"क्षण अमर झाला आहे... खरंच" हिल्डा तिला प्रतिसाद देत आहे...

"भाई..." त्या दोघी वळून एकदमच माझ्याकडे पाहाताहेत.

मीही म्हणतो आहे... "क्षण अमर झाला आहे..." पण माझं मन आंतल्या आंत गुदमरून ओरडतं आहे... "क्षण अमर झाला आहे. हें खरं; पण आम्हांला मारून ! क्रांतिकारकांना मारून... आम्ही आतां जिवंत असून मेलेले ठरणार आहोंत. हिल्डा... हिरा... आम्ही मेलो आहोत."

तरीहि माझं मन उचंबळून आलं आहे. मला मद्यांपासून चढायची थांबलेली नशा आता तुफान आवेगानें चढूं लागली आहे. मला आनंदाची जाणीव उशीरानें पण खरीखुरी व्हायला लागली आहे... मला नाचावं, गावं, प्यावं व पीतच रहावं असं वाटूं लागलं आहे... त्या दोघींकडे वळून मी उत्फुल्लतेने म्हणतो आहे...

"हिरा पुढें काय ?... पुरे करना तुझं गाणं..."

आणि ती गायच्या ऐवजीं एकदम ओक्साबोक्सी रडायलाच लागली आहे. हिल्डाला पण रडूं आवरेनासं झालं आहे... माझ्या मनांतील विषण्ण करून टाकणारी रडारड मात्र संपली आहे... आणि...

बाबूराव व मंडळी दुर्गेची आरती उफाळून व उसळून म्हणूं लागले आहेत...

गोव्यांत उगवणाऱ्या स्वातंत्र्यसूर्याचें जणुं ते उषःसूक्तच !!

●●●

अनुक्रमणिका






कविवर्य रवींद्रनाथ टागोर ह्यानीं त्यांच्या "चित्रा" ह्या नाटचकाव्यांत एक दिव्य प्रीतिकथा रंगविलेली आहे त्या मूळ इंग्रजी काव्याचा हा मराठींत केलेला अनुवाद. उच्चतर प्रीतीची अस्फुट ओळखसुद्धां सत्याच्या निकषावर घांसली जाते. असत्याचा, स्वप्नांचा पोकळ डोलारा कोसळून पडतो तो त्याच ठिकाणीं आणि अमर प्रीतीचं देखणं रुप जन्माला येतं. शब्दावळ विरते, आत्म्याला आत्म्याची ओळख पटते जेव्हां खरी प्रीति स्निग्ध नेत्रांनीं दोन जीवांना ओवाळते.

मदनाच्या प्रसन्नतेनें चित्रांगदेला वर मिळतो तुझं पुरुषी रुप नाहींसं होऊन तुला एक वर्षपर्यंत दिव्य सौंदर्य प्राप्त होईल आणि तुझ्या इच्छित् प्रियकराची तूं स्वामिनी होशील. चित्रांगदा आपल्या अप्सरेसमान रुपानें अर्जुनाला मोहून घेते. अर्जुन चित्रांगदेला वश होतो. परंतु नंतर चित्रांगदा मदनाजवळ माझं ढळतं सौंदर्य परत घे; मी होते तशी सौंदर्यहीन बनूं दे अशी प्रार्थना करते. दिव्य प्रीतीचा साक्षात्कार चित्रांगदेला आत्मविश्वास देतो. मी आहे तशी अर्जुनाला आवडूं शकेन ही तिची मनीषा पूर्ण होते.

# चित्रांगदा

## —सौ. मोहिनी वर्दे

(मदन आणि वसंत प्रवेश करतात. चित्रांगदा नतमस्तक आहे)

**चित्रा :** हे देवा तूं पंचबाणधारी प्रीतीचा परमेश्वर आहेस कां ?

**मदन :** होय. ब्रम्हचाच्या हृदयांत प्रथम ज्याचा उदय झाला तो मी आहे. पुरुष आणि स्त्री यांचं सुख वेदनाबद्ध करून टाकणारा मी आहे.

**चित्रा :** खरं आहे मला कळताहेत त्या वेदना आणि ते बंध. हे देवा आणि तूं कोण आहेस ?

**वसंत :** मी वसंत, ह्याचा मित्र ऋतुराज आहे मी. मृत्यु अन् वैफल्य जगाला कुरुप बनवण्याचा एकसारखा प्रयत्न करतात आणि मी त्यांचा पाठलाग करून तितक्या वेळा त्यांचा पराभव करतो; मी चिरतरुण आहे अमर आहे.

**चित्राः** हे वसंतराजा मी तुला वंदन करतें.

**मदन :** हे सौंदर्यवान् अनामिका तुझी अशी कोणती शपथ आहे कीं, ज्यासाठीं हें तुझं नवतारुण्य खडतर तपश्चर्येनं आणि शरीरतापानं तूं कोमेजून टाकत आहेस ? प्रीतिदेवाच्या पूजेला ही तपश्चर्या, हा त्याग योग्य नाहीं. तूं कोण आहेस, तुझी मनीषा काय आहे ?



**चित्रा :** मणिपूर राजघराण्यांतली मी कन्या. चित्रा माझं नांव. आमच्या घराण्याला पूर्वीं भगवान् शंकरानीं परंपरागत पुत्रप्राप्तीचा वर दिला. पण दुर्दैवानें माझ्या आईच्या पोटीं जन्म पावणाऱ्या गर्भाची निश्चिती करण्यास तो असमर्थ ठरला. आणि मी अशी स्त्री असून पौरुषासाठीं हपापलें.

**मदन :** म्हणूनच तुझे वडील तुला मुलाप्रमाणें वाढवीत आले हें माहीत आहे मला. राज्यकर्त्यांचीं कर्तव्यें आणि योद्धयाचें धनलालव त्यांनीं तुला शिकवलं.

**चित्रा :** स्त्रीचा अंतर्महाल सोडून पुरुषवेषांत फिरते आहे ना मी ? तें त्याकरितां पण त्यामुळें स्त्रीच्या सुकुमार लाघवाची गति मी जाणीत नाहीं. मदनाचे अबोलखेळ, नेत्रबाणांची देवघेव त्यामुळेंच पारखी झाली.

**मदन :** हं ! सुंदरी ती शिकावी लागत नाहीं कुणाला कुठें कसं छेडावं याची त्या कुशल नेत्रांना अभिजात देणगी असते. पाण्यांत जन्मलेला मासा कां कधीं पोहायला शिकतो ?

**चित्रा :** तर ऐकावं महाराज. एके दिवशीं अशी शिकारीच्या शोधांत पूर्णेच्या तीरावर गेले, वृक्षाला घोडा बांधून हरिणाचा मागोवा घेत एका दाट जाळींत जाऊन पोहोंचले. पायाखालची वाट एकमेकांत








गुंतलेल्या, मिळून गेलेल्या वृक्षवेलींतून नागमोडी वळणं घेत सरकत होती. दाट जंगलांत रातकिड्यांच्या किर्र् आवाजाला वाळल्या पानांची सळसळ साथ देत होती. अचानक अगदीं सुकून गेलेल्या पानांच्या बिछायतीवर विसावलेला एका पुरुषाचा देह मला आडवा आला. संतापानें वाट करून देण्यास मी त्याला आज्ञा केली. पण त्यानें हालचाल केली नाहीं. धनुष्याच्या टोंकानीं त्याला मी टोंचलें. त्याच क्षणीं धरणीमधून ज्वालामुखी उभा राहावा तसा तो उंच वीर माझ्यासमोर उभा राहिला. ओंठाआडून कृतकृत्यतेनें त्यानें माझ्या-कडे पाहिलें मात्र– हे देवा, मी माझी, मी इतके दिवसाची वीरांगना राहिले नाहीं. धनुर्धारिणी राहिले नाहीं कीं, राजकन्या उरले नाहीं. मी होते फक्त स्त्री ! जाणीव होती ती स्त्रीत्वाची !

**मदन :** थांब चित्रे थांब, तोच तो पवित्र क्षण ! ज्या क्षणीं पुरुषाला आणि स्त्रीला स्वतःची ओळख पटते. मी ती पटवून देतो आणि मग त्यांची जीवनकहाणी अमर प्रीतीची आणखी एक साक्ष बनते.

**चित्रा :** पण महाराज ती कहाणी माझी झाली नाहीं. मी पृच्छा करतांच त्यानें आपलं 'अर्जुन' हें नांव सांगितलं. कुरुकुलभूषण, महा-रथी, आजानुबाहू माझ्या स्वप्नांचा आदर्श अर्जुन होता तो महाराज. त्याला वंदन करण्याचं भान मला राहिलं नाहीं. बारा वर्षे त्याला मी प्रतिस्पर्धी मानत आले. त्याच्या मांडीला मांडी लावून शरसंधान करण्याची, त्याच्याबरोबर एकाच लक्ष्याचा वेध घेण्याची कोण ईर्षा! त्याच्याशीं स्पर्धा करून त्याला जिंकण्याची केवढी वेडी महत्त्वाकांक्षा पण त्या एका क्षणीं माझं सर्वस्व, तारुण्य आणि शौर्य त्याच्या पदस्पर्शासाठीं मृत्तिका होण्यास अर्पण करायला मी तयार होते. वेडे, भुलावणीच्या भोंवऱ्यांत अडकलीस आणि तो त्या गर्द रानांत केव्हां दृष्टीआड झाला तेंही पाहिलं नाहींस ना ? ना त्याची पूजा केलीस ना क्षमा मागितलीस. त्या दैवी क्षणाचा तसा अव्हेर केलास. एखाद्या रानडुकराप्रमाणें खालीं मुंडी घालून उभी राहिलीस आणि तो उद्दामपणें समोरून निघून गेला. महाराज ! दुसऱ्या दिवशीं मी माझ्या पुरुषी वस्त्राचा त्याग केला. कंकणें, पैंजण, मेखला लेवून जांभळ्या कुसुंबी रंगाचं वस्त्र परिधान केलें; संवय नसलेली तीं वस्त्राभरणें लज्जेप्रमाणें माझ्या शरीराला चिकटलीं होती. परंतु मी माझ्या कार्याला उद्युक्त झाले. आणि शोध घेतां घेतां वनांतील शंकराच्या मंदिरांत मला तो भेटला.

**मदन :** चित्रे, तुझी कहाणी मला शेवटपर्यंत सांग. हृदयापासून माझा जन्म झाला आहे. भावनांचें गूढ मी जाणतो.

**चित्रा :** मी काय विचारलं, मला काय उत्तरं मिळालीं याची मला केवळ पुसटती आठवण आहे. देवाधिदेवा ! मला सर्व कांहीं विचारूं नका. परंतु त्यावेळीं कडाडून वीज पडावी तशी शरमेनें मी ठिक्कर झालें तरी माझ्या शरीराचे तुकडे तुकडे झाले नाहींत इतकी मी पुरुषी आहे हें खास स्मरतें मला. लाल तापल्या सळयांचा चटका बसावा तसे त्याचे शेवटचे शब्द माझ्या कर्णसंपुटांना जाळीत होते. मी ब्रह्मचर्याची शपथ घेतली आहे. तुझा पती होण्यास मी लायक नाहीं."

हं ! पुरुषाची शपथ ! हे कामदेवा अगणीत योगीजनांनी उभ्या जन्माचा पुण्यसंचय स्त्रीचरणांशीं रिता केलेला तुम्ही जाणता. हा तर क्षत्रीय. मी माझ्या धनुष्याचे दोन तुकडे करून माझे बाण अग्निला अर्पण केले आहेत. धनुष्यबाण मारून राकट झालेले हे माझे हात पाहून मला घृणा वाटते. हे प्रीतिदेवा ! हे मकरध्वजा ! हे देवाधिदेवा ! माझा अर्थहीन पुरुषी अहंकार आणि माझी पुरुषा-प्रमाणें संपादन केलेली विद्या मी आपल्या पायाशीं चुरगळ टाकली आहे. मला अबलेचें बल जाणण्याची, आयुधाविना युद्धाचे धडे गिरवण्याची शक्ती द्या.

**मदन :** मी तुझा सुहृद आहे चित्रे. तो जगाला जिंकणारा, अर्जुन त्याचं वचन खोटं ठरवून तुझ्या पायापाशीं आणून सोडीन.

**चित्रा :** आपल्या मदतीशिवाय त्याचं हृदय जिंकायला फार काला-वधी लागेल. हृदयाची ओळख पटणं हा आयुष्याचा खेळ आहे. मला तेवढा धीर आतां नाहीं. म्हणून हे प्रीतिदेवा ! हे चिरतरुण ऋतुराजा मी तुम्हाला शरण आले आहे. माझ्या देहाचें कुणाला आकर्षित करूं न शकणारं साधेपण, हा जन्मजात अन्याय दूर करा. देवा ! केवळ एक दिवस माझ्या हृदयांत अकस्मात् उमललेल्या प्रेमा-इतकं सुंदर करा मला. फक्त एका दिवसाकरितां परिपूर्ण सौंदर्याचा लाभ करून द्या. त्या एका दिवसावर मी उरलेल्या आयुष्याचा अर्थ लावीन.

**मदन :** हे कामिनी तुझी कामना सफल होईल.











**वसंत :** केवळ एका दिवसाकरितां नव्हे तर सबंध एक वर्षपर्यंत वसंतांतील चेतोहारी शोभा तुझ्या अंगोपांगाभोंवतीं रुंजी घालीत राहील.

**मदन :** तथास्तु.

**[ प्रवेश २ रा ]**

(गर्द रानांतील पुष्करणीच्या तीरावर अर्जुन विरहावस्थेनें उसासे सोडीत आहे.)

**अर्जुन :** मी स्वप्नांत तर नाहीं? कीं खरोखर जागृतावस्थेंत मी तें अनुभवलं. पुष्करणीच्या तीरावरून शेवाळलेल्या ओल्या गवतावर बसून मी गतजीवनाच्या चित्रांत रंग भरत होतों. भोंवताली संध्या-छाया दाटत होती आणि संथ लयींत वेलींच्या मांडवांतून परिपूर्ण सौंदर्याची एक लहर स्त्री स्वरुपांत हेलावली. तिची पावलं पाण्याच्या तीरावर संगमरवरी शिलातलावर स्थिरावली. तिच्या पदतलाची धरती जणूं आपल्या थरथरत्या हृदयाला सांवरत होती. उगवतीच्या सोनेरी किरणांत धुकं वितळावं तसं तिच्या सौंदर्यांत तें शरीराचं आवरण विरून जावं आणि आनंदाचा परमोच्च क्षण असाच झुलत राहावा असं मला वाटलं. चकचकत्या पाण्याच्या नितळ आरशांत वाकून तिनं आपलं रुप न्याहाळलं; स्वतःच्या रुपसौंदर्याच्या दीप्तीनं क्षणभर ती स्तब्ध झाली. पुढल्या क्षणीं हास्याचं चांदणं फुललं. डाव्या हातानं तिनं तिचा कचभार हलकेच सोडवला आणि तो केशसंभार तिच्या शेजारी जमिनीवर रुळूं लागला. वक्षस्थलाचा वस्त्रभार हलका केला. नितांत रमणीय अवयवाचं एकेक आभरण निखळून पडत होतं. ती नितंबिनी शिलातलावर विसावली. उमलत्या कमलानं उगवतीला मान कलती करून कधीं आपलं रुप पाण्यांत न्याहाळलं होतं कां ? नाहींतर एव्हाना आपल्याच रुपावर खिळून राहिली असतीं सगळीं सोनकमळं. पण घडूं नये तें घडलं आणि पाहूं नये तें पाहिलं त्या कमलवदनेनं. तिनं आपला सौंदर्यदेह पाहिला मात्र खेदाची नाजुक छटा रुपाला घेऊन बसली. आपला केशसंभार अलगद एकवटला. वस्त्रें सांवरलीं, एक खुला निश्वास टाकून ती नितंबिनी विलंब न करता शेवाळामधून वेलींत अदृश्य झाली. हाय ! सोनेरी संध्या रात्रींत विलीन झाली आणि मी ? माझ्या आकांक्षांची पूर्ति जन्मली आणि अंतर्धान पावली. पुन्हा मी एकटा राहिलों.

अरे पण कोण ह्या देवळाचं दार वाजवतंय ? कोण ? तीच ती ? हृदया धीर धर. हे देवी घाबरूं नकोस. मी क्षत्रीय आहे.

**चित्रा:** आपण माझे अतिथी आहात. मी ह्या मंदिरांत राहाते. आपला उचीत सत्कार कसा करावा तें मी जाणत नाहीं.

**अर्जुन :** हे चारुगात्री, निव्वळ तुझं दर्शन हा माझा सत्कार होय. तुझी अनुज्ञा असली तर मी तुला एक प्रश्न विचारूं शकतो कां ?

**चित्रा :** अनुज्ञा आहे.

**अर्जुन :** हे विधुवदने, जगाला तुझ्या अलौकिक सौंदर्यापासून वंचित करून ह्या एकाकी ठिकाणीं तूं कां राहातेस ? अशी कोणती अर्चना तुला इथे बांधून ठेवीत आहे.

**चित्रा :** माझ्या अंतरीच्या इच्छापूर्तीसाठीं मी ह्या एकांत स्थळीं शंकराच्या पूजेला बांधून घेतलं आहे.

**अर्जुन :** अखिल जगताचं एकमेव इच्छास्थान तें ! तूं कशाची इच्छा करतेस ? सांग. मी सूर्योदयाचीं पहिलीं किरणं ज्या पर्वतावर पडतात त्या पूर्वेपासून पश्चिमेपर्यंत सर्व जगाची पदयात्रा केली आहे. जे उत्कृष्ट अमोल सौंदर्यपूर्ण आहे तें मी पाहिलं आहे. सांग तुझ्या एका शब्दासाठीं मी अडलों आहे. अशी कोणती वस्तु किंवा कोणती व्यक्ति आहे तिची तूं इच्छा करतेस ?

**चित्रा :** मला जो हवा आहे त्याची कीर्ति चराचरांत पसरली आहे.

**अर्जुन :** असा कोण देवांचा आवडता भाग्यवान् पुरुष आहे ज्यानें तुझ्या हृदयाला जिंकलं आहे ?

**चित्रा :** वीरांचा वीर परमोच्च क्षत्रीय कुलाचं भूषण आहे तो.

**अर्जुन :** असत्याच्या वेदीवर तुझ्या सौंदर्याचा बळी देऊ नकोस. खोटी कीर्ति सूर्योदयापूर्वी वाढत जाणाऱ्या धुक्यासारखी असते. देवांना लाजवील असा सर्वोत्तम कोण आहे, कोणत्या राजकुळांत असूं शकेल?

**चित्रा :** तुला त्याचा हेवा वाटतो ना ? सर्व जगतांत पसरलेली कुरुकुलाची कीर्ति तूं जाणत नाहींस ?

**अर्जुन :** कुरुकुलांतील वीर ?

**चित्रा :** आणि त्या पुरुषोत्तमाचं नांव तुला माहीत नाहीं ?

**अर्जुन :** सांग सांग. तुझ्या मुखांतून त्याचं नांव ऐकूं दे.

**चित्रा :** अर्जुन ! जगज्जेता अर्जुन. होय त्या अजर अमर नामाचा जयजयकार मी लाखो मुखांतून ऐकला आणि माझ्या हृदयांत लपवून ठेवला. हे पांथस्था, तूं उद्विग्न कां ? त्या नांवांतील सोनेरी झगमग खोटी आहे कां ? तशी असेल तर सांग ह्या क्षणी माझ्या हृदयपटांत रत्नाप्रमाणें जपलेलं तें नाम मी खडा समजून दूर फेकून देईन.

**अर्जुन :** त्याचं नांव त्याची कीर्ति त्याचं धैर्य आणि त्याचं शौर्य खोटं असो वा खरं असो पण कृपा करून हे सुंदरी, तुझ्या हृदयांतून तूं त्याचा त्याग करूं नकोस. कारण. . . . कारण ह्या क्षणीं तुझ्या पायाशीं नतमस्तक असलेला तोच आहे.

**चित्रा :** तूं अर्जुन ?

**अर्जुन :** होय, तोच मी. तुझ्या पायाशीं तुझ्या प्रेमाची भिक्षा माग-णारा याचक.

**चित्रा :** पण अर्जुनाने बारा वर्षपर्यंत ब्रह्मचर्य व्रत घेतले आहे हें खरें नाहीं कां ?

**अर्जुन :** चंद्रामुळें रजनीचें कौमार्य जसें ढळतें तसा माझा निश्चय तुझ्यापुढें विरून गेला आहे.

**चित्रा :** हं ! धिक्कार असो तुझा. स्वतःच्या आत्म्याची वंचना करण्यासारखं तूं माझ्यांत काय पाहिलंस ? ह्या दुधाळ हस्तस्पर्शासाठीं काळ्याभोर नेत्रांतील जादूसाठीं तूं तुझ्या प्रतिज्ञेशीं अप्रामाणिक होतो आहेस ? ह्या मांसल शरीरापायीं तुला तुझ्या अंतरात्म्याचा विसर पडावा ना ? खरोखर तुझा पुरुषार्थ खोटा आहे आणि तुझी कीर्ति देखील खोटी आहे.

**अर्जुन :** हे देवी माझं शौर्य, माझा अभिमान, माझी कीर्ति सर्व असत्य आहे. सर्वकांहीं स्वप्न आहे. फक्त तूं पूर्ण आहेस. तूं विश्वाची संपत्ती आहेस, दारिद्र्याची इतिश्री आहेस, जगांतील कार्यकारणाची परि-समाप्ति आहेस. एकमेव स्त्री तूं आहेस. इतर केवळ स्मृतिरुप आहेत. तुझं क्षणाचं दर्शन परिपूर्णतेचा अमर पूर्णविराम आहे.






**चित्रा :** अरेरे ! अरेरे ! ती मी नव्हे रे, नव्हे रे मी ती हा दैवकृपेनें प्राप्त झालेला भास आहे. अर्जुना परत फीर. हे माझ्या प्रियतम योद्धया असत्याची पूजा करूं नकोस. तुझं असामान्य हृदय या आभासाला दान करूं नकोस.

**( प्रवेश ३ रा )**

(चित्रांगदा उद्विग्न बसलेली आहे मदन व वसंत प्रवेश करतात.)

**चित्रा :** हे कामदेवा केवढी भयानक ज्वाळा आहे ही. जिनं माझं शरीर तूं ग्रासून टाकलं आहेस. ज्याला मी स्पर्श करतें तें जणूं जळून जात आहे.

**मदन :** काल रात्रीं काय घडलं हें जाणून घेण्यास मी उत्सुक आहे.

**चित्रा :** ऐक. काल मी संध्यासमयीं वसंतांत फुललेल्या पाकळ्या विखुरलेल्या तृणशय्येवर विसावलें होतें. आणि अर्जुनानें गायलेलीं स्तुतीगीतं आठवीत होते. दिवसभर सांठवलेल्या मधुकुंजांतील मधु थेंबाथेंबानीं चाखत होते. माझा पूर्वायुष्याचा इतिहास विसरून गेले होते. जणूं कांहीं अमित प्रहरांसाठीं फुलणाऱ्या फुलानें रानावनांत गुणगुणलीं जाणारीं स्तुतीगीतांची अस्पष्ट कुजबूज ऐकावी आणि नंतर अंबराकडे लागलेली आपली दृष्टी लववावी, एका निश्वासांत हुंदका देखील उमटूं न देता धुळींत मिसळून जावें; आणि जिला भूतकाल नाहीं, भविष्यकाल नाहीं अशी एक लघुकथा विराम पावावी.

**वसंत :** अमर्याद वैभवशाली जीवन एका सकाळपुरतं विकसून विरून जावं.

**मदन :** जणूं कधीं न संपणारा अर्थ एका लघुतम काव्यपंक्तींतून झरत राहावा.

**चित्रा :** तशा अवस्थेंत दक्षिणेकडील पवनलहरींनीं मला लडिवाळपणें गोंजारून निजवलें. मालतीकुंजाखालीं विसावलेल्या माझ्या शरीरावर वरून एकेक मूक चुंबन ओघळत होतं. प्रत्येक फुलानें माझे केश, माझे कर, माझा वक्षभार म्हणून आपली बिछायत निवडली होती. मी निद्राधीन झालें आणि गाढ निद्रेंत असताना अचानक लवलवत्या अग्निशिखेप्रमाणें प्रखर नजरेचा स्पर्श माझ्या निरामय शरीराला जाणवला. वर उठत असताना समोर तो पुरुष मी उभा पाहिला. चंद्र पश्चिमेला कलला होता. पर्णांतून डोकावून तो सुद्धा विधात्यानें निर्मिलेलं मानवी शरीराचं हें शिल्प टक लावून पाहात होता. हवा गंधवती होती आणि निस्तब्ध रात्र रातकिड्यांच्या संगीतानें नादावत होती. सरोवरांत पडलेली वृक्षलतांची पडछाया स्तब्ध होती. हातांत दंड घेऊन उभा राहिलेला तो ऊंच आणि निश्चल पुरुष रानांतील वृक्षाप्रमाणें भासत होता. डोळे उघडतांच मला वाटलं कीं, माझ्या जीवनांतील वास्तवता विरून गेली आहे. छायेप्रमाणें अंधुक असलेल्या माझ्या एकटीच्या विश्वांत मी जन्म पावले आहें. लज्जेनें अधोवदन असताना मीं त्याचे शब्द ऐकले. प्रिये ! प्रियतमे ! माझा जन्मजन्मांतरीचा एक हुंकार उमटला "नाथ माझा स्वीकार करा. माझ्या सर्वस्वाचा स्वीकार......!" बाहू पसरून त्याच्यापर्यंत पोहोंचलें. चंद्र वनराजींत मावळला. काळोखाच्या एका पडद्यानें सृष्टी गाडून टाकली. स्वर्ग आणि पृथ्वी, काळ आणि वेळ, सुख आणि दुःख, जीवन आणि मृत्यू एका आनंदमय असह्य वृत्तींत एकरुप झाले. प्रकाशाच्या पहिल्या किरणावरोबर, पक्षांच्या पहिल्या कूजनाबरोबर मी जागी झालें. तो निद्राधीन होता. त्याच्या चंद्रकोरीप्रमाणें विलग ओठावर हास्य तरळत होतं. प्रभातीचा तांबडा प्रकाश त्याच्या विशाल












भालप्रदेशावर पडला होता. एक श्वास सोडून मी उभी राहिलें. चढत जाणाऱ्या सूर्याच्या धारदार किरणांआड मी वेलीची पानं सरकवलीं. त्याचा चेहरा तृप्त होता. माझ्या भोंवतालची सृष्टी तीच होती. पायाखालची पृथ्वी तीच होती. आणि मी कोण आहे याची स्मृती मला त्या वेळीं झाली. कसं सांगूं परमेश्वरा. शेफालीच्या फुलानीं विखुरलेल्या रानांतील वाटेवरून स्वतःच्या सांवलीला घाबरलेल्या हरिणीप्रमाणें मी आकांतानें धावत गेलें. रानांतल्या एका निस्तब्ध कोपऱ्यांत दोन हातांनीं नेत्र झांकून घेतले. अश्रूंना मार्ग मोकळा केला, पण अश्रू उतरेना.

**मदन :** हे दुर्दैवी मानवी कन्ये ! तुझ्यासाठीं देवांच्या कोठारांतून स्वर्गांतली सुगंधी मदिरा आणून पृथ्वीवरील एक रात्र मी कांठोकांठ भरली आणि तुला प्राशन करायला दिली तरी ही आर्त वेदना ?

**चित्रा :** कुणी प्राशन केली ती मदिरा ? अप्राप्य प्रीतीची पूर्तता मला सांपडली होती पण दुर्दैवानें ती निसटली. हें उसनं घेतलेलं सौंदर्य. ह्या खोटेपणानें मला घेरून टाकलं आहे. हें अनृताचं कवच पूर्ण उमललेल्या फुलाच्या पाकळ्याप्रमाणें गळून पडणार आहे आणि माझ्या प्रेमाची उरली सुरली निशाणी त्याबरोबर नाहींशी होणार आहे. आणि नंतर मदनदेवा ! प्राणांचे कान करून ऐका, एक स्त्री आपल्या रुपशरीराचं नग्न दारिद्रय पहात रात्रंदिवस अश्रू ढाळणार आहे. माझ्या व्याकूळ हृदयाचा उल्हास माझं उसनं शरीर एकसारखं ओरबाडून घेतंय्. हें माझं मौल्यवान शरीरच माझा प्रतिस्पर्धी झालंय्. प्रतिदिनीं या शरीराला नटवून सजवून प्रियतमाकडे पाठवायचं आणि त्याचे केलेले लाड कोरड्या डोळ्यांनीं पाहायचं हा निर्घृण खेळ मी रोज खेळत आहे. हे देवराजा माझा शाप ठरलेलं वरदान परत घे !

**मदन :** पण मी वर काढून घेतला तर तूं तुझ्या प्रियतमासमोर कशी उभी राहाशील ? रतिसुखाचा पहिला घोट घशाखालीं उतरतो न उतरतो तोंच तें असं प्रियकरापासून हिसकावून घेण्यांत कृतघ्नता नाहीं कां ? क्रोधातिशयानें तो तुझा धिक्कार करणार नाहीं कां ?

**चित्रा :** मी माझें दुःख सहन करीन. या प्रतारणेपेक्षां तो धिक्कार सह्य ठरेल.

**मदन :** ऐक वत्से, माझं ऐक. असा एक काळ येईल जेव्हां झाडांची पानं गळूं लागतील त्याबरोबर तुझं सौंदर्य वितळून जाईल आणि तुझ्या प्रियकराला अंतीम सत्याची जाणीव होऊन तो तुझा स्वीकार करील; तोपर्यंत धीर धर.

**(प्रवेश ४ था)**

(अर्जुन व चित्रांगदा जंगलांतील शिलातलावर)

**चित्रा :** नाथ आपण कसला विचार करीत आहांत ?

**अर्जुन :** हलक्या स्पर्शानें ही फुलांची माला ज्या लयींत तूं विणत आहेस त्या लयींत माझे वनवासाचे दिवस आनंदांत सरत आहेत. आणि या मालेप्रमाणें पूर्ण सुखाच्या राशीवर वसण्याचं भाग्य मला स्वगृही गेल्यावर लाभणार आहे ना ?

**चित्रा :** गृहीं गेल्यावर ? पण आपलं प्रेम घरासाठीं नाही नाथ.

**अर्जुन :** म्हणजे काय ? तूं माझ्याबरोबर स्वगृहीं येणार नाहींस ?

**चित्रा :** अशक्य, अशक्य आहे नाथ. आपण कधींही त्याचा उच्चार करूं नये. जें नित्य आहे तें स्वगृही न्यावं. गळणाऱ्या पानांबरोबर, विरणाऱ्या फुलांबरोबर निर्माल्य बनूं द्या या रानफुलाला. त्याचं कार्य संपल्यावर महालाच्या संगमरवरी भिंतीकडून ह्या सुकलेल्या फुलाला दयेची अपेक्षा करता येईल कां ?

**अर्जुन :** (हळुवारपणें) प्रिये ! आपली प्रीति तशी आहे ?

**चित्रा :** खचित याहून निराळी असू शकेल कां ? प्रियकरा त्याबद्दल खंत कशाला ? विश्रांतीच्या कांहीं क्षणांसाठीं जन्मलेलं सुख तिथंच सोडून द्यावं. ते फार काळपर्यंत सोवत करूं शकणार नाहीं. सुखाच्या परत जाण्याचा मार्ग अडवून धरला म्हणजे सुखाचं दुःख होऊं लागतं. सौख्याची टवटवी आहे तोपर्यंत तें भोगावं. हं ! जाउद्या तें. पहा दिवस कलला आहे. ही माला आपण आपल्या गळयांत घालावी आणि श्रांत झालेल्या मला आपल्या बाहूंचा आश्रय द्यावा. हे प्रेमळा आपल्या अधरमीलनांत असंतोषाची उमटलेली क्षणिक लकेर विरून जावी.

**(प्रवेश ५ वा)**

(मदन व वसंत प्रवेश करतात.)

**वसंत :** मित्रा तुझ्या बरोबर प्रवास करणं आतां मला झेपत नाहीं. तूं प्रज्वलित केलेला अग्नि जळत ठेवणं हाताबाहेरचं काम ठरतंय्. अनावर झोपेमुळें कांहीं वेळेला माझ्या हातांतला पंखा गळून पडतो. आणि धगधगीत निखाऱ्यावर थंड राखेचा थर दाटतो. पुन्हा पुन्हा स्वप्नांतून जागा होऊन मी विझणारा अग्नि प्रज्वलित करतो. पण मित्रा आतां फार काळपर्यंत हें चालूं शकणार नाहीं.

**मदन :** हं ! तुझी बालकाप्रमाणें असलेली चंचलता मला ठाऊक आहे. स्वर्गांत आणि पृथ्वीवर तूं नेहमीं असा अस्वस्थ असतोस. अनिवार हौसेनें निर्माण केलेली स्वतःची कृती एका क्षणांत विध्वंस करणं तुझ्या हातचा मळ आहे. परंतु आपण हातीं घेतलेलं हें कार्य आतां फार काळ टिकणार नाहीं. वर्ष आतां संपत आलं आहे.

(जातात)

(पूर्वार्ध)













मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास





**सोमा समेळाचा अख्खा पगार मारला जातो आणि तरीही तो चौकीवर जाऊन तक्रार करीत नाहीं. रस्त्यांत त्याला अकरा दिवसांचें एक अर्भक सांपडतं – तरीही तो ते चौकीवर नेऊन देत नाहीं. पण कां ?**

# काळ-काम आणि वेग

—श्रीराम कामत



**'ब्लॅक आऊट'**च्या दिवसांत एका संध्याकाळला सोमा समेळ घामाघूम होऊन धापा टाकत घरांत शिरला.

तोंड पांढरंफटक, हातापायाला कापरं, डोळे ताठ-सताड. वाटावं ह्याला खवीसानंच धरला.

कपाळावर हात मारीत तो उम्या-उम्या दारांत कोसळला. वठणीच्या गुरासारखा भेकला, "सुने, हायस गो ऽ. . ."

ही सून सोमाची वायको. पूर्ण नांव सौ. स्नेहलता वगैरे वगैरे, कोणाचंसं ऐकून सोमानं लग्नांत बायकोचं हें नांव ठेवलं होतं. त्याला-सुद्धा कांहीं सरळ हांक मारतां येत नव्हती. स्नेहलतेची सुनेक हलैता झाली होती. आणि असा घाईला आलेला असला कीं मग नुसतीच सून —

त्याची सून होती वाजूला शेजाऱ्याच्या दारीं. त्यांच्या 'लढाय'च्या गोष्टी रंगल्या होत्या. पेपरांत छापून आलं होतं पाकिस्तानचा राजा अयूबखान कैद झाला. बरं झालं होतं. म्हणावं मेल्याला मुन्शीपाल्टीच्या दिव्याला उलटा टांगा आता. फाशीच दिला पाहिजे. नाहींतर लढाई नाहीं बंद करायचा तो हलकट... असं बरंचसं शेजारीण वारेमाप सांगत होती. आणि कमरेवर वसवसणाऱ्या तान्ह्या पोराला दामटीत सोमाची कारभारीण तें कवतीक ऐकत होती.

तर थोरलं पोरगं कुठूनसं केकाटलं, "आये, दादा आला गो–"

नाहींतरी चाळींत पोरांचा तो एक उद्योगच झाला होता. दिवस मावळायची वाट बघत बसत. मग यांच्या गस्ता सुरू होत. हातांत काठ्या, तोंडांत शिट्या– जाम कालवा करीत हीं फिरत. 'च्यायला, हा आला' अन् 'तो गेला उडत', 'तुमचा उजेड बाहेर येतो हो,' अन् 'साला पाकचा छत्रीधारी आपल्या चाळींत उतरला तर काय मज्जा येईल नाही रे ?'... सारखी ही असली वटवट चालायची.

पोरांचा खेळ झाला होता. लढाई, भोंगे, प्रकाशबंदी, गस्त, अफवा– सगळाच. सकाळीं उठल्यापासून रातला निजेपर्यंत.

आणि तीं निजलीं कीं, त्यांच्या काळजीनं आईवडिलांना निजा लागत नसत. सारखे भोंग्याचेच भास होत. ते ऐकत बिछान्यावर ही तळमळत पडत. बाप्ये लोक पाळीपाळीनं गस्त घालण्याची 'ड्युटी' करीत.

थोरल्याची साद कानीं गेली तशी त्याची आई फसाफसा पाय ओढत खोलीकडे धांवली. बाकी पसारा चाळींत कुठकुठं विखुरला

अनुक्रमणिका



होता. त्यांना तिनं पुकारलं, "अर ए किसोर, सुसेम, रसमा... कुठं मेलींत कायकीं !"

आणि दारावर बघते तर गुढग्यांत मान खुपसून कारभारी बसलेला, पिसुडलेल्या पारव्यासारखा.

म्हणजे हें अवचिन्ह ! दळिद्राचं लक्षण ! दिवेंलागणीला उंबरा अडवून असं बसलं कीं, लक्ष्मी आल्यापावलीं परत जाते म्हणतात.

"अवदसा लागली काय हो ?" समेळीण खवळली.

"आं !" सोमानं फक्त मान हलवली. टाळक्याला केस उरलेच नव्हते. तुकतुकीत टक्कल. टाळू उडताना दिसायची.

"उठा दारांतले. जिवाला नसेल बरं-तर पडा जाऊन खाटीवर, हाय रिकामी . . . "

सोमा उठला नाहीं. हललाही नाहीं जागचा. मान उचलून बायकोकडे बघायलाही तो तयार नव्हता.

"आज कुठं शेण खाऊन आलांत ?" तिनं करवादून विचारलं. तिला वाटलं कारभारी दारूच्या तारेंत असावा.

"नाय गो सुने." तो जड आवंढा गिळत पुटपुटला आणि घशांत हाडक अडकल्यासारखा घुटुक् घुटुक करीत राहिला.

"हें काय खूळ नाय तें ?"

तसा सोमानं एकदम गळाच काढला, "घात झाला गो, मोठाच घात झाला सुने–"

"हाय ठाऊक मस–" त्याच्या कारभारणीनं संतापानं मान उडवली.

ह्या घरांत पडल्या दिवसापासून तिचा घात झाला होता. नवरा हा असा पेंढार अन् पदराशीं पोरांचं लेंढार...नुसती विटणूक !

कमरेचं पोर दाणकन् तिनं सोमाच्या पुढ्यांत आदळलं. कार्टं पिसाळलं. जोरजोरानं किंचाळूं लागलं.

ह्याच्याहून दीड वर्षांनीं मोठी असलेली रेशमा एका हातानं चड्डी सावरीत आणि दुसऱ्या हातानं कपाळाच्या बटा ओरबाडीत आयेच्या मागं सावली कशी उभी होती. एकूण प्रकार बघून पोरटी बिथरली आणि डोळे चोळत कोंबडीच्या पिलासारखी पाय फुटेल तिकडे उडाली. 'हां हां' "हूं हूं" करून मुसमुसत दिसेल त्याला सांगत सुटली, "आमच्या दादांना घात झालाय् हो ! एकदम घात. . . "

चाळींतल्या लोकांना वाटलं अपघात– किंवा पक्षाघात ! नाहींतरी तीन वर्षांच्या चिमुरड्या पोरीला नीट सांगायला काय कळणार ? शेजारी पाजारी चौकशीला सोमाच्या खोलीवर धांवले. गर्दी लोटली.

"काय झालं समेळणी ?" आलेला विचारूं लागला.

"इचारा ह्यांनाच !" तिला तरी कुठं ठाऊक होतं ? "आता आलांच आहांत तर . . . "

"अगो, माज्या ह्या पोराला तरी घे ! कवाधर रडतोय्." सोमानं म्हटलं. मान वर काढून किल्या डोळ्यांनीं एकदाच आजूबाजू पाहिलं. पुन्हा तोंड खालीं घातलं. ते घट्ट गुढघ्यांत खुपसून बसला.

"भाऊ नूं—" कोणीसं पुढं झालं. "काय व्हतं ? म्हणजे नक्की..."

"काय व्हायचं राह्यलं नाय ! सगळं झालं–" हा सोमा समेळ–आवाज भोंग्याचा घोक्याच्या. विळविळणारा.

"उठत नाय व्हय ? पाय लुळा पडला का आपलं..." दुसरा एकजण विचारूं लागला, "नाय म्हणजे डाक्तराला सांगायला बरं !"

"डास्तर ?" सोमानं नकळून विचारलं.

तशीं वरींच तोंडं एकदम उघडलीं, "हां ! बोलावलेला बरा ! ताबडतोब आडमीट करून टाकील हास्पिटलांत."

"आं ! आं !" आता मात्र समेळ गोंधळला. म्हणजे हें नक्की काय चाललं आहे त्याला कळेना. "कोनला पोचवायचा हो हास्पिटलांत ?"

"तुमालाच भाऊ ! अहो, तेंच बरं. ह्या रोगाला कम्प्लीट इस्रान्तीची जरुरी असते बघा. आमचा सासरा अर्धांगानंच गेलाहो... म्हणून म्हणतों..." कोणीशी माहिती दिली.

सोमानं ताडकन् मानेचा फणा वर काढून त्याच्याकडे पाहिलं. तावातावानं म्हटलं, "मला अर्धांग नाय झाला–"

"भाऊ पक्षाघात म्हणजेच अर्धांग...म्हणजे, त्याचं काय होतं... माणसाचं अंग लुळं होतं." दुसरा एक जण समजूत घालूं लागला.

त्याला सोमा समेळानं अध्यांवर रोखलं, "कोनला झाला हाय पक्षाघात ? भांचोद, काय नाय तें बोलतां एक एक ? मी नाय अजून लोळागोळा होऊन पडलों. वेस ताठ हाय, साफ ठणठणीत. हास्पिटलांत पोंचवायला आलांत व्हय मस ? आन् तिथून कुठं मसनांत न्हेणार व्हय रे ?. . . "

तसा चार चौघांनीं नाराजीचा सूर खेंचला, "आता आमाला हो काय ठाऊक ? तुमची धाकली लेक बरडत आली... तवा तर माहिती पडली."

पण हें सगळं उसनं अवसान होतं. आठवण झाली तसा हातपाय गाळून तो नरम पडला. वळचणींतल्या कुत्र्यासारखा.






अशांत एकानं डोकं लढवलं, "अरे, अपघात-ॲक्सीडन्ट झाला असेल भाऊंना. गाडींतून उतरतान्ना पडले असतील.नाहींतर रस्त्यावर काय कमी खड्डे आहेत– च्यायला, ह्या ब्लॅक आउटांत काय दिसत पण नाहीं. मुरगळला असेल पायबीय —"

"नाय बुवा!" सोमानं नकारार्थी मान हलवली. पण आवाजांत जोर नव्हता. निश्चितपणा नव्हता. नळाला पाणी नव्हतं.

शेजाऱ्यापाजाऱ्यांची निराशा झाली होती. त्यांची खेप फुकट गेली होती. विनाकारण वेळ मोडला होता. शेजारधर्म दाखविण्याची एक बऱ्यापैकीं संधी हुकली याचं त्यांना दुःख झालं होतं. सोमाची कारभारीण मात्र तोंडभर हंसून तीळगुळ पेरीत बोलली, "आमचं हें असंच. जावा मंडळी तुमी. लई उपकार वघा !"

ह्या आवाजांत काय नांगी होती देव जाणे ! पण काळजांत कळ यावी तसा सोमा कळवळला. उचक्या देत घुमूं लागला, "घात झाला सुने, मोठाच घात"–

लोकं मागं फिरलीं. त्यांनीं विचारलं, "भाऊ, अहो असं काय करतां ? सांगून टाका बघूं काय तें ?"

सोमानं त्यांनाच उलट सवाल केला, "अरे, काय सांगू ? तोंड नाय मस . . . आतां कसं होणार माज्या पोरांचं. एक दोन नाहींत सा–सा पोरं. शिवाय ही आन् मी–मी हा असा नालायक. . . "

"नोकरी गेली वाटतं," एकजण बोलला.

परस्पर दुसऱ्यानं उत्तर दिलं, "छा ! ती हाय . . . बँकेत शिपायाची . . . कायम."

"मग ? सर्वांनाच कोडं पडलं.

गुढग्यातली मान आणीकच खाली मोडून धापा टाकीत सोमानं सांगितलं, "सगळाच्या सगळा पगार गेला."

आता त्याला मोकळं वाटलं होतं. छातीवरचं ओझं उतरल्यासारखं झालं होतं. सुटकेचा निःश्वास टाकून तो ताजा झाला.

पोराला पाजत बाजूला कारभारीण बसली होती. तिनं कपाळावर हात मारून घेतला, "अरे कर्मा ! आता–"

"पाकीट मारलं ?" शेजारी चौकशी करूं लागले.

"पाकीट हायच कुटं ? शिवाय तसा बावळट नाय मी." सोमाला आतां कंठ फुटूं लागला. होता." कनवटीला सगळ्या नोटा कशा गच्च आवळल्या होत्या . . ."

सगळ्यांची उत्सुकता शिगेला लागली होती.

"मग हें कसं झालं ?"

"सुटली असेल कनवट आन् आवळायला गेले तर पडला पगार खालीं. रस्त्यांत. . .लक्ष असतं कुटं ?" कारभारीण वैतागत हुंदके देऊं लागली.

"ह्या ! असं कधीं झालं हाय ?" सोमा तिच्या अंगावर कावला "अगो नशीब तुझं म्हणून जित्ता ऱ्हायलों. बाकी जीवावरच पसंग बेतला होता. आपल्या ह्या गल्लीच्या तोंडाशींच घडलं पानपत. . ."



अनुक्रमणिका

त्याला बोलता ठेवण्यासाठीं बाकीच्यांनीं ताल धरला, "व्हय, व्हय !"

सोमानं मानेला हिसका दिला, आपल्याच मांडीवर थाप मारून घेतली. थोवाड वाकडं करून डाव्या कानांत बोट घालत प्रत्येकाकडे नीट बघून घेतलं. आधीं हंसला आणि मग घोगऱ्या आवाजांत तो सांगू लागला—

"अक्षी पानपत बघा ! म्हणजे काय ? रस्त्यावर मिट्ट काळोख. माणसाला माणूस दिसत नाय अशी परिस्थिती ! नायतरी ह्तंच कोन बघायला ? रस्त्यांत बिल्कुल शुकशुकाट ! सालं चिट-पाखरूं पण नाय ! एकला मी, काळोखांत चाललों हाय. पायांत व्हाणा वाजतायत्– व्हय, तो तितकाच आवाज . . . तर असाच आलो बघा खेड गल्लींतून. सैतानचौकीच्या नाक्यानं आपल्या गल्लींत शिरलों नाय तर हा सामने उभा ! वाटच बघत असावा. सरळ मानगूटच धरलीन् माजी. म्हणला, पगार टाक. मी पुसलं, कोन तूं. तो बोलला तुजा बाप. तवा मात्र मी गडबडलो. तर हो ! बाला गांवी मसणात जाळून मगचशानी ममईला चाकरीला आलों मी. ह्या गोष्टीला नाय म्हटलीं तरी आज लई वर्स जालीं. आन् हा म्हनतो मी तुजा बाप. माणूस कितीका धीराचा असेना ह्या प्रकाराला डरनारच. निमूट मी कनवटीला हात घातला. नोटाचं पुडकं त्याच्या स्वाधीन केलं. म्हणजे भूत होऊन बा जर माज्या पगारासाठीं तळतळत असला तर तुरुप्त होऊं दे . . . आत्म्याला गति मिळूं दे, एकदा वर जाऊं दे ! आन बघत ऱ्हायलो कसा वर जातो म्हणून . . . अहो कसलं काय ? चकलो हो साफ. हा आपला मागच्या मागं काळोखांत गडप झाला. गमलंच नाहीं मस. लांबून बोलला, समेळा, थॅन्क यू ! आणि खदखदा हसला. पण एक सांगतो त्याचा आवाज मी वळखला . . ."

"अहो भाऊ, आधी उठा आणि चला पोलीस ठाण्यावर. वर्दी देऊन येऊं या." शेजाऱ्यांनीं आतां पुढाकार घेतला.

"अरे पण माणूस वळखीचा. आन जबरदस्त–" सोमा समेळ उठायला तयार होईना.

तशी त्याची कारभारीण ओरडली, "असला तर आपल्या घरचा. जा पोलिसांत वर्दी देऊन या . ."

"अहो, पगार वापस मिळेल. नाहींतर महिना गुजरणार कसा ?" दुसरा एकजण व्यवहार सांगू लागला.

सोमा उखडला. हात उडवून बोलला, "भांचोद, मला नाय कळत ? अरे पण ह्याचं नांव पोलिसांत सांगावं कोनी ?"

समेळीण उसळली, "असा कोन बालिस्टर लागून ऱ्हायला मेला ?"

"बालिस्टराचं भेय नाय ?" कारभारी तिची समजूत काढूं लागला, पण हा हाय दादा . . ."

"कोण ? दादा ?" सगळ्यांनी एकच आवाज उठवला.

"व्हय, तीच पंचायत . . . आपला गंगाराम दादा . . ." सोमा समेळ अगदीं खालच्या आवाजांत कुजबुजला.

आणि तरीहि तें नांव प्रत्येकाला ऐकूं गेलं. तें ऐकलं मात्र

## महानपण देगा देवा

[इयें 'तुका' सुद्धां मौनी झाला असता]

**महानपण देगा देवा ।**
**लुंगी महात्म्याचा ठेवा ।**
**न्यायाधीश रत्न थोर ।**
**तया वशिल्याचा मार ।।**
**महापुरें धरणें जाती ।**
**तेथें अधिकारी वांचती ॥**
**मुका म्हणे जाण ।**
**व्हावें मौनाहुनी मौन ॥**



आणि जो तो कासावीस झाला. मान खालीं घालून नुसते जड निश्वास टाकूं लागला. बोलणार काय ? प्रत्येकाची वाचाच बसली. आतां शेजारधर्म संपला होता. सोमाच्या खबरीला चाळींतील लोकं गेलीं होती ही बातमीसुद्धां गंगाराम दादाच्या कानावर गेली तर ह्यांना फुकट ताप होणार होता. चाळींत राहून तिथल्या दादाशीं वैर करण्यांत अर्थ नव्हता. नेम नाहीं मोफत एक दिवस अंगाशीं यायचं.

एकएक चुपचाप काढता पाय घेऊं लागला. ह्यांना कोणी बोला-वलं नव्हतं. आणि न सांगता ते जाऊं लागले तर सोमा गप्पच बसला.

गर्दी कमी झाली तशी समेळीण उसळली, "हुडूत् ! कांवळे मेले. नुसता टायर फुटला तरी फडफडा उडाले."

"हूं :! जिणंच मुस्किल जालंयू." तिचा कारभारी बोलला.

"काय नाय मुस्किल ! योकच तर महिना–"

"पण जायचा कसा ? छा: ! हें नाय उपेगाचं. येतों जाऊन . . ."

सोमा तिडीक आल्यासारखा उठला.

"कुठं निघालांत हो ?" समेळणीनं विचारलं.

"पोलिसांत, भांचोद काय व्हईल तें व्हईल."

"बसा बघूं स्वस्थ–"

"पण मी म्हणतो काय म्हणून ?" मी नाय डरत त्या भड-व्याला."

"मस भेय वाटतं–"

"तुला हाय कुटं माजी गरज ?"

"बोलतां काय ?"

"बरोबर बोलतूं. सा महिने झाले हात लावूं दिला हायस अंगाला ? रातला जवळ आलों तर सांगतेस पुना गर्वार जालें तर जीव दिन बसखाली."

"अहो, पण . . ."ती त्याची समजूत घालूं लागली.

"हाय ठावं, सा पोरं झालीं–व्हतात एकाद्याला. नाविलाज हाय. म्हणून काय . . . इश्श्या ! जीव दिलेला बरा ! सुखच नाय








"वायकोचं तर काय करणार ?" सोमा सात्विक संतापानं ओरडला, म्हणजे होतं काय ? टाळकंच उठतं, इचार भडकतात. कायबी होतं, कसंबी होतं, पण बोलून नाय उपयोग . . ."

"आमी नाय कळ काडत ? पोरांपायी काढायला हवी. ती केंद्राची डास्तरीण सांगते–"

"ती गेली मसणांत. आन संगं तुला बी घाडील. आप्रेशन कर म्हणेल."

"मग करायला हवं–" कारभारीण बोलली.

"ह्या: ! मीच करतो. कटकट नाय." सोमा बोलला.

तिची हरकत होती. समेळणीला षंढ नवरा नको होता. मर्दच हवा होता. चाळींत ह्रिची लाज झाली असती, तिच्या गळ्यांतील मंगळसूत्र चौदा कॅरेटचं झालं असतं. निदान समेळणीची तरी तशी श्रद्धा होती. या मुद्यावर ती कोणाचंच कांहींसुद्धां ऐकून घ्यायला तयार नव्हती. कामगार कल्याण केंद्राच्या डॉक्टरचं नाहीं––कारभाऱ्याचंदेखील नाहीं.

पगार गेला, आतां पुढं काय ?–ही विवंचना तीं दोघंही विसरलीं. आणि नाहीं त्या ह्या भलत्याच प्रश्नावर वाद घालूं लागलीं. विशेष म्हणजे सोमा आज तेजींत होता, जोरांत होता आणि त्याची सुनेक हलैता तरम होती, चावत चावत बोलत होती. ती चित झाली होती. आणि हें तिलासुद्धां कळलं होतं. सहा महिन्यांत पहिल्यानंच.

अर्थात हा वाद संपणारा नव्हता. रात्रौ बारा वाजतां चाळवाल्यांची 'समेळभाऊ' अशी साद आली तेव्हाही तो संपला नव्हता. आणि मग पहांटे पांच वाजतां पाळी आटपून सोमा घरीं परतल्यावर तो पुन्हां नव्यानें सुरू झाला. तात्पर्य––कांहीं नाहीं. शून्य !

☆☆


'अहो, मला दाढी करायची होती दाढ नव्हती काढायची'

दुसरा दिवस. तशीच संध्याकाळ. कृत्रिम काळोखाची. गडद, सावट आलेलं वातावरण. अफवांनी भारलेली आणि भरलेली हवा.

सोमा समेळाचं थोरलं पोरगं केकाटतं, "आये, दादा आला."

आणखी एकदोन पोरं बोंबलतात, "समेळभाऊंच्या हातांत–"

सोमा राक्षसासारखा त्यांच्या अंगावर ओरडतो, "भांचोद, गप्प ! फुकट बोंब ह्यांची––"

पण हा खोलीपर्यंत जाईतो शेजाऱ्यापाजाऱ्यांची त्याच्या भोवती गर्दी होते. डाव्या हातानं पोटाशीं त्यानं अलगद धरलेल्या पांढऱ्या गाठोड्याकडे प्रत्येकाचं लक्ष असतं. आणि लक्ष जाण्यासारखंच तें गाठोडं होतं. 'मॅटर्निटी' होम मधून बाहेर पडणारं पोर अगदीं असं पांढऱ्या वस्त्रांत गुंडाळलेलं असतं.

सोमा समेळ दारांतूनच कारभारणीस हाक मारतो, "सुने, संभाळ हें . . ."

"अहो, पण काय––" शेजाऱ्यांपैकीं कुणीतरी विचारतो.

"पोर–"

"ओ ? कोणाचं ?" मोठा आवाज उठतो.

सोमा समेळ हादरतो, गांगरतो, "आं ? कोणाचं म्हणजे ? माजं . . . म्हणजे गावलं मस . . . काळोखांत पायाला लागलं."

शेजारी लागलीच कावकाव करतात, "भाऊ, मग पोलिस ठाण्यावर पोचवा तें. टाकलेलं पोर. भानगडीचं . . ."

"हात् तुमची !" सोमा ओरडतो, "माणसं अहांत काय जनावरं रे ? काल चांगला दोनसे रुपये पगार गेला माजा. ज्यानं मारला तोसुद्धां वळखीचा. पण पोलिसांत माज्यासंगं यायला तुमच्यापैकीं एकबी कबूल व्हईना. आन् हें पोर. धावारा दिसाचं. दुबळं, पोरकं. त्याला पोलिसांत पोचवायला समदे धावाल नायतर काय ? लेको थू: तुमची ! जा, घरांत निमूट आन् कारभारणीकडे दावा ह्यानपण . . ."

असं सांगून तो घरांत शिरतो आणि मागं दाराला कडी घालतो.

एव्हांना समेळीण पुढं पुढं करणाऱ्या आपल्या मुलांना दटावीत सफेत गाठोडं सोडून त्या अर्भकाला मोकळं करते.

काळं कुळकुळीत पोर. वळवळत मोकळं होतं. बटबटीत डोळे विचकत तें हाताच्या मुठी आवळतं. पाय ताठ करतं. वसवसून 'टचँ टचँ' करून गळा काढतं.

सोमा समेळची पोरं टाळ्या वाजवतात, हंसू नाचूं लागतात.

फक्त त्यांच्या आयेच्या डोचक्यांत शिणीक उठते. ती कारभाऱ्यावर ताव काढते, "अहो, आधीं आप्रेशन करून या तुमी . . . मस नाय, आतां दुनयेलाच उपसर्ग होऊं लागला तुमचा . . ."

"व्हय् व्हय् !" हा सोमा बोलतो, बायकोच्या हुषारीबद्दल. त्याचं मत बदलूं लागतं. सुनेला अर्धी नाहीं, सबंध पुरत्या गाढवाची अक्कल आहे अशी त्याला शंका येऊं लागते.

"आन् पगारबी जाया नग कोणा रांडांच्या मढ्यावर . . ." समेळीण बडबडतच असते.

●●●

# फॉस्फोमिन—तुमच्या घरकुलांतील आरोग्याचें कारंजें

फॉस्फोमिन्‌मध्यें व्हिटॅमिन् बी कॉम्प्लेक्स अन् मल्टिपल् ग्लायसेरोफॉस्फेटस् हीं आरोग्यास अत्यावश्यक असलेलीं द्रव्यें आहेत. त्याच्या नियमित सेवनानें तुमच्या घरांत आरोग्यदेवतांचा निवास सदोदित राहिल. प्रत्येक कुटुंबांत फॉस्फोमिन् असावयास हवें. तें नेमानें घेतल्यास दमल्यासारखें किंवा थकवा आल्यासारखें कधीं वाटायचेंच नाहीं. फॉस्फोमिन् म्हणजे आरोग्याची निर्झरिणी. त्याच्यामुळें भूक तर वाढतेच, शिवाय शरीराच्या रोगप्रतिबंधक शक्तींतहि चांगलीच भर पडते फॉस्फोमिन घेणाऱ्या कुटुंबाच्या वाऱ्यासहि रोगराई फिरकूं धजत नाहीं. फॉस्फोमिन्—हिरव्या रंगाचें, फलस्वाद असलेलें उत्कृष्ट व्हिटॅमिन् टॉनिक.















‘फ्लेश अँन्ड दि डेव्हिल’ या चित्रपटांत ग्रेटा गार्बो व जॉन गिल्बर्ट.

प्रेमदेवता





# ग्रेटा गार्बो

—के. टी. देशमुख

**मूक** चित्रपटांचे युग अस्तास जाऊन बोलपटांच्या नवयुगाची ती सोनेरी प्रभात होती.

मेट्रो गोल्डविन मेयर चित्रसंस्थेनें १९३० सालीं **‘अॅना क्रिस्ती’** हा बोलका चित्रपट सादर करतांना जाहिरातींत फक्त ‘Garbo Talks’ एव्हढेंच म्हटलें.

इतके पुरेसें होतें. जाहिरातींमध्यें नाविन्य होतें. गार्बो बोलणार ही घोषणा होती ! मेट्रो गोल्डविन कंपनीच्या शाही दरबारांत मूक चित्रांच्या जमान्यांत थाटलेल्या सिंहासनावर अधिष्ठित झालेली चित्रसम्राज्ञी ग्रेटा गार्बो ही चित्र-अप्सरा, चित्रलक्ष्मी, जगन्मोहि ी आपल्या पहिल्या बोलपटांत प्रत्यक्ष बोलणार हें फार मोठें आकर्षण होते ! या त्रैलोक्य-सुंदरीच्या मुखांतून निघालेली दिव्य वाणी ऐकण्यासाठीं साऱ्या जगांतील चित्ररसिक अतीव उत्सुक असणार हे मेट्रो कंपनीनें अगोदरपासून अचूक हेरलें आणि तो बोलपट त्रिखंडांत गाजलाहि !

गार्बोच्या सौंदर्यांत जी मोहिनी आहे, जी जादू आहे, तिच्या व्यक्तिमत्त्वांत जी रम्य अशी गूढता आहे तें सारें कांहीं तिच्या आवाजांतहि आहे याची साक्ष रसिकांना पुरेपूर पटली. कोटयवधि रसिकांचे कान तृप्त झाले. मनें संतुष्ट झालीं. पहिल्या दर्जाच्या चित्रतारकांच्या मालिकेंत ‘सर्वांहून अधिक प्रिय’ असें एक बहुमानाचें श्रद्धास्थान गार्बोनें देशोदेशींच्या चित्ररसिकांकडून मिळविलें होते. बोलपटांच्या नवयुगास प्रारंभ होत असतांना अनेक नामवंत चित्रतारे आणि चित्रतारका ‘कमजोर’ किंवा ‘कुचकामी’ जातीचा आवाज म्हणून बाद झाले. ते विस्मृतीच्या काळोखांत केव्हां गडप झाले हें समजलेसुद्धां नाहीं. त्याचप्रमाणें रंगभूमीवरील नामवंत अभिनयपटु आणि संवादकुशल अभिनेते बोलक्या चित्रपटांत तेजानें चमकण्यास येथून सुरुवात झाली. रंगभूमीवरील गाननिपुण नटनटयां बोलपटसृष्टींत आघाडीवरच्या कलावंतांना येऊन सामील झाल्या. मूक चित्रपटांच्या अमदानींतील चित्रतारे आणि तारका निखळून पडावयास लागल्या. आवाजाच्या किमयेनें मातबर कलावंतांचीं आसनें रहाटगाडग्या-प्रमाणें खालीं वर होऊं लागलीं. परंतु, हॉलिवुडच्या या अस्थिर स्वरुपाच्या चंदेरी दुनियेंत एक वास्तु मेरु पर्वता-प्रमाणें स्थिर होती—अचल होती आणि ती म्हणजे ग्रेटा गार्बो ह्या चित्रसम्राज्ञीचें सिंहासन !

स्वीडन देशामधून ती हॉलिवुडला











अनुक्रमणिका

**गार्बोच्या सौंदर्यातल्या मोहिनीची आणि तिच्या व्यक्तित्वांतल्या रमणीय गूढतेचा हा मनोज्ञ व रसीला परिचय—**

**गार्बोचीं चित्रें पाहणारांना पुनःप्रत्यय देणारा आणि नवीनांना हुरहुर लावणारा**

आली. त्यावेळीं तिचें वय अवघें एकोणीस-वीस वर्षांचें होतें. अमेरिका हा तिला परका देश होता. त्या देशाची इंग्रजी भाषा तिला परकी भाषा होती. योग्य तें मार्गदर्शन करण्यासारखें वडीलधारे माणूस किंवा हितचिंतक जवळपास कुणी नसतांना चित्रपट सृष्टीमधील सर्वांत उंच अशा शिखरावर जाऊन पोहोंचण्या-सारखें तिच्याजवळ काय होतें ?

तिच्याजवळ होतें नेटकें सौंदर्य ! कलेसाठीं राबण्याची--घोर परिश्रम कर-ण्याची तयारी आणि ताकद ! तीव्र बुद्धिमत्ता, महत्त्वाकांक्षा आणि निर्धार !

ग्रेटा गार्बो हॉलिवुडच्या मोहमयी रुपेरी दुनियेंत १९२५ सालीं नायिका म्हणून दाखल झाली. तो मूक चित्र-पटांचा जमाना होता. त्यापूर्वी स्वीडन या आपल्या मायदेशांत तिनें '**ग्रेटा गस्टास्फन**' या अवघड आणि बोजड नांवानें '**दी सॅगा ऑफ गॉस्टा बोर्लिंग**' ह्या मूक चित्रांत नायिकेची सुंदर भूमिका वठविली होती. या तिच्या भूमिकेचा बोलबाला विशेषतः युरोपखंडांत होऊं लागला तेव्हां मेट्रो गोल्डविन कंपनीनें या उदयोन्मुख नायिकेस अलगद वेंचून अमेरिकेंत आणलें आणि तिच्याबरोबर करारमदार उरकून घेतले. नव्या अभिनेत्रीस नवें नांव दिलें 'ग्रेटा गार्बो' !

हें नांव मोठें सुलक्षणी शुभयोगकारक कसें ठरले ते आपण आतां पाहूं.

मेट्रो कंपनीनें तिची नायिकेची भूमिका असलेलें पहिलें चित्र '**टॉरेंट**' १९२६ सालीं रुजू केलें. ग्रेटा गार्बो चित्रतारकांच्या मालिकेंत येऊन बसली. यानंतर पुढच्याच वर्षी '**फ्लेश अंड दि डेव्हिल**, हा तिचा चित्रपट प्रकाशित झाला. तेव्हापासून ग्रेटा गार्बो प्रेक्षकांच्या हृद-याची राणी बनली. लक्षावधि चित्र-रसिक तिच्या अनुपम सौंदर्यानें वेडे झाले.

ग्रेटा गार्बोचें सौंदर्यशाली दर्शन मनाला मोह पाडणारें होतें. गोंडस तरतरीत असा मुखचंद्रमा, बुद्धिमत्तेची विशालता दर्शविणारें भव्य कपाळ, तेजस्वी नजर, निश्चयी हनुवटी, मानेपर्यंत रुळणारा सरळ लांबसडक विपुल केशसंभार, उंच आणि सडसडीत नाजुक देहयष्टि आणि अभिनयांतील आणि हालचाली-मधील जरबयुक्त खानदानी भारदस्त-पणा ह्या सर्वांचा मिळून एक मनोहर गूढ स्वरुपाचा मिलाफ तिच्या भूमिकांमध्यें पहावयास मिळे ! तिच्या चित्रपटांतील प्रणयप्रसंग प्रेक्षकांना वेडावून सोडीत. परंतु अशा उत्कट प्रीति संगमाच्या मधुर अशा क्षणांतसुद्धां तिच्या अभिनयांत शृंगारिक भाव नव्हता. मीलनाची उत्सु-कता नव्हती. छछोर आवाहन नव्हतें. संयमपूर्ण तटस्थता होती. सौंदर्याच्या मोहकतेबरोबर अलिप्ततेचें अहंकारी दर्शन तिच्या भूमिकांत उग्र स्वरुपांत प्रकट होत असे. ऐन जवानींत आलेल्या वाघिणीला पाहिलें म्हणजे जसा तिच्या सौंदर्याइतकाच तिच्या उग्रतेचा मनावर परिणाम होतो त्याप्रमाणें गार्बोचें प्रखर तेजस्वी व्यक्तिमत्त्व प्रेक्षकांच्या अन्तः-करणांत एक जरब निर्माण करी.

तिच्या खाजगी आयुष्यांतसुद्धां तिच्या उपस्थितींत एक दरारा निर्माण होत असे. मेट्रोच्या स्टुडिओंत वावरतांना ती कुणाबरोबर सलगीनें वागत नसे. कुणाशी एक शब्द बोलत नसे. सेटवर हजर असतांना मध्येंच इतर पात्रांचे शॉट्स् घेण्यास सुरुवात झाली कीं, ती एकदम दुसरा रिकामा कोपरा गांठी. जवळपास हिंडण्याची कुणाला हिंमत होऊं नये इतक्या विलक्षण ताठ्यानें ती बसून



**'यौवनगंधा प्रीतियामिनी गार्बो'**

राही. कॅमेऱ्यासमोर आपली भूमिका वठवितांना तोच दिमाख ती कायम ठेवी. त्यामुळें पडद्यावरील तिच्या तडफदार भूमिका पाहून प्रेक्षक स्तिमीत होत. अशी आत्मनिष्ठ अहंकारी करारी स्वभावाची नायिका प्रेक्षकांना फार मोह पाडी. तिचे तेजस्वी सौंदर्य प्रेक्षकांना आकर्षून टाकी. प्रेयसी किंवा प्रियसखीबद्दल वाटावें असे ते आकर्षण नव्हते. त्या आकर्षणाला एका श्रद्धेचा आधार होता. रसिकगण तिला 'सौंदर्याची' 'प्रेमाची' देवता मानीत असत ! तिच्या चित्रपटांना जाणें म्हणजे आपल्या उपास्यदेवतेच्या–'प्रेमदेवते'च्या दर्शनाला जाणें अशी त्यांची मनोभावना होती.

अशी लौकिकवान अभिनेत्री 'नायिका' म्हणून ज्या ज्या चित्रपटांत प्रकट होई ते ते चित्रपट चित्रसृष्टीच्या इतिहासांत 'बहुमानाचे टप्पे' ठरले आहेत.

मूक चित्रपटांच्या जमान्यांतील 'फ्लेश अँड दि डेव्हिल' (१९२७) आणि त्यानंतर बोलपटांच्या युगांतील,

| | |
|---|---|
| **ग्रँड हॉटेल** | (१९३२) |
| **क्वीन क्रिस्तीना** | (१९३३) |
| **अँना करेनिना** | (१९३५) |
| **कॅमिल्** | (१९३६) |
| **मारी वालुस्का** | (१९३७) |
| **निनोच्का** | (१९३९) |

या प्रत्येक चित्रानें जगांत उत्पन्नाचे नवें नवें उच्चांक प्रस्थापित केले आहेत. तिचें प्रत्येक चित्र मेट्रो कंपनीला जणूं काय एकेक सोन्याची खाण लाभत गेली होती असें म्हटलें तर, त्यांत कांहीं अतिशयोक्ति होणार नाहीं.



प्रत्येक चित्राचा मोबदला म्हणून तिला अडीच लक्ष डॉलर्स मिळत असत. हे सारे पैसे चित्रीकरणास प्रत्यक्ष सुरुवात होण्यापूर्वी आपल्या पदरांत पडले पाहिजेत अशी तिची अट असे. म्हणजे कॅमेरा सुरु होण्या अगोदर एव्हढी प्रचंड रक्कम तिला चुकती झालेली असे. त्या चित्रपटांत प्रमुख भूमिका आणि दुय्यम भूमिका करणाऱ्या सर्व कलावंतांची यादी तिच्या मंजुरीविना पक्की केली जाऊ नये अशीहि तिची अट होती. सेटिंग्ज, पोषाख, दागदागिने इ. महत्वाच्या गोष्टी आपल्या नजरेखालून घालण्याचा आपला हक्क ती कटाक्षानें चालवी.

जॉन गिल्बर्ट, जॉन बॅरीमूर, क्लार्क गॅबल, रॉबर्ट टेलर, फ्रेडरिक मार्च, चार्लस् बॉयर, हर्बर्ट मार्शल आणि मेल्व्हिन डग्लस अशा प्रथम श्रेणीमधील नटनटींनी तिचीं चित्रें भुषविलीं. जोन क्रॉफोर्ड, लिऑनेल बॅरीमूर, लुई स्टोन, वॉलेस बेरी सारखे नामवंत कलावंत तिच्या चित्रांत दुय्यम दर्जाच्या भूमिकांतून चमकले. तिचें नवें चित्र प्रेक्षकांच्या दृष्टीनें एक विलक्षण औत्सुक्याचा, कौतुकाचा आणि आनंदाचा विषय ठरत गेल्यानें, 'मी' 'मी' म्हणविणारे मोठे चित्रतारे तिच्या चित्रांत नायकाची भूमिका मिळावी म्हणून खटपटी, लटपटी करूं लागले.

जॉन बॅरीमूर हा अभिनेता चित्रपटसृष्टींत एक बडे प्रस्थ होऊन गेले. ग्रेटा गार्बोबरोबर त्यानें **ग्रँड हॉटेल**मध्यें प्रमुख भूमिका वठवितांना असे जाहीर उद्गार काढले कीं, "गार्बोबरोबर काम करण्याची संधि मिळणें एक अपूर्व योग मानला पाहिजे. तिच्याइतकी सुंदर, चतुर, बुद्धिमान आणि अभिनयकुशल नटी हॉलीवुडमध्यें दुसरी नाहीं असे माझे मत आहे !"

तिला लाभलेल्या अनेक लोकप्रिय नायकांमध्यें जॉन गिल्बर्ट हा चित्रतारा सर्वांहून अधिक यशस्वी ठरला. जॉन गिल्बर्टसारखा ऊंच, देखणा, उमदा, शूर, दिलदार वृत्तीचा नायक गार्बोस इतका शोभून दिसे कीं, नायकनायिकेची इतकी सुंदर अनुरूप जोडी पुन्हां झाली नाहीं असे चित्रपटसृष्टीचा इतिहास आग्रहाने सांगतो. **'फ्लेश अँड दि डेव्हिल्'** या अतिशय गाजलेल्या मूकपटानंतर ही यशस्वी जोडी **'क्वीन क्रिस्तीना'** बोलपटांत पुन्हां एकत्र आली. या चित्रांतील प्रेमप्रसंगें पहातांना प्रेक्षकांना ही जोडी म्हणजे साक्षात् रतिमदनाचीच जोडी वाटूं लागे. क्रिस्तीना राणीच्या प्रेमाची ही शोककथा पाहून परततांना सहृदय प्रेक्षक विषण्ण मनःस्थितींत चित्रपटगृहांतून बाहेर पडे.

अंतर्यामीं प्रेमाचा साक्षात्कार झाला तेव्हां इंग्लंडच्या आठव्या एडवर्ड राजानें राजपदाचा त्याग केला आणि त्यानें आपला विवाह एका सामान्य घराण्यांतील सुशील विधवेशी केला. जगाच्या इतिहासांत फार पूर्वीं, सरंजामशाहीच्या युगांत, क्रिस्तीना राणीचें प्रेम एका उमद्या सामान्य शिलेदाराबरोबर जमलें हें तिच्या प्रधान मंडळाला आणि जनतेला रुचलें नाहीं. प्रेमासाठीं ती वनवासाला, देशांतराला जाण्यास सिद्ध होते. आपल्या मस्तकावरील राजमुकूट तिनें खालीं उतरून ठेवला. शोकाकूल प्रजाजनांचा तिनें अखेरचा निरोप घेतला. सिंहासनाच्या पायऱ्या उतरून जहाजावरील शिडीच्या पायऱ्या ती उत्साहानें चढून जाते. परंतु या दुर्दैवी राणीच्या प्रियकराचें शव तिथें तिची वाट पहात होतें. द्वंद्वयुद्धांत तो मारला गेला होता. स्वप्नांचा चक्काचूर होतो ! तरीसुद्धां तिचा निर्धार कायम आहे. जहाज किनाऱ्यापासून कुठेंतरी दूर दूर जातें आहे. शिडाला टेकून ती उभी आहे. बाजूस प्रियकराचें प्रेत आहे.

अति नाजुक अशा प्रेमकथेला अचानकपणानें दिलेली तीव्र शोकाची कलाटणी अन्तःकरणांत एक कठोर छेद घेऊन जाई. गार्बोनें उभ्या केलेल्या नायिकेंत

ही सर्वोत्कृष्ट भूमिका मानली जाते. तिचा जन्मच मुळीं ही भूमिका वठविण्याकरितां झाला आहे अशी रसिकांची भावना झाली.

व्हीकी बॉम्च्या सुप्रसिद्ध कादंबरीवर आधारलेला **'ग्रँड हॉटेल'** अनेक वैशिष्टयांनीं गाजला होता. अव्वल दर्जाचे अनेक चित्रतारे आणि तारका त्या चित्रांत चमकले होते. परंतु त्यांना लीलेनें सहज बाजूस सारून गार्बोनें एका नृत्यांगनेच्या भूमिकेंत अभिनयकौशल्याचा कळसच गांठला होता. **'मारी वालुस्का'** अर्थात **'कॉक्वेस्ट'** या महान् चित्रामध्यें गार्बोनें नेपोलियनच्या प्रेयसीची मनोवेधक भूमिका वठविली. कथेमध्यें मध्यबिंदू म्हणून नेपोलिअन कल्पिला गेल्या कारणानें गार्बोच्या भूमिकेस डावें स्थान दिलें गेलें होते. शिवाय चार्लस् बॉयर या देखण्या तरतरीत अभिनयनिपुण नटश्रेष्ठानें असा प्रभावी तडफदार नेपोलिअन समोर उभा केला कीं, गार्बो निष्प्रभ ठरली. आतांपावेतो गार्बोचा असा लौकिक होता कीं, तिच्या चित्रांत, इतर पात्रांचें सोडूनच द्या, परंतु सुंदर डौलदार उमद्या मनोवृत्तीच्या नायकालासुद्धां, तिच्या उपस्थितींत फिका वाटत असे. ग्रेटा गार्बो आणि चार्लस् बॉयर—दोघांनीहि अभिनय कौशल्याची जी अटीतटीची लढाई केली त्यामुळें हें चित्र रसिकांना एक 'मेजवानी' म्हणून ठरलें ! गार्बो निस्तेज झाली ह्याचेंच कौतुक होऊं लागलें. या चित्राची जाहिरातहि पुढें "A picture in which Garbo has failed !" अशी होऊं लागली. मोठी व्यक्ति घसरली तर त्याचा बोभाटासुद्धां मोठा !

**'निनोच्क्का'** या बोलपटानें आणखी एक धक्का दिला. परंतु हा धक्का गोड स्वरुपाचा होता. गार्बोनें आतांपर्यंत धीरगंभीर प्रवृत्तीच्या थोर स्त्रियांच्या भूमिका नटविल्या होत्या. निनोच्का-मधील तिची भूमिका खेळकर, आनंदी, विनोदी स्वरुपाची होती. गार्बोचें मनमोकळें हास्य दर्शविणारें पहिलें छायाचित्र ह्याचवेळीं प्रथम प्रसिद्ध झालें ! ही तिची भूमिका यशस्वी ठरली. हें चित्र खूप गाजलें.

दुसऱ्या महायुद्धास तोंड लागलें होतें. चित्रपटाच्या मोठ्या बाजारपेठा एकापाठोपाठ युद्धाच्या खाईंत उध्वस्त होत होत्या. चित्रपट धंदा नुकसानींत आला होता. दिवसेंदिवस उत्पन्न कमी कमी होऊं लागल्यामुळें जास्त खर्चाची मोठी शानदार चित्रें कांहीं काळ स्थगित ठेवण्याचा निर्णय घेणें अपरिहार्य झाले. कमी खर्चाच्या दुय्यम प्रतीच्या चित्रपटामध्यें काम करण्याचें किंवा आपल्या मोबदल्यांपैकीं एक डॉलरहि कमी करण्याचें गार्बोनें साफ नाकारलें. चित्रसृष्टीमधून ती निवृत्त झाली.

आयुष्यांत तिनें लाखो डॉलर्स कमावले. त्यावेळेस हल्लीप्रमाणें सुपरटॅक्स, इन्कम टॅक्स असे भरमसाट कर सरकारी तिजोरींत भरावे लागत नसल्यानें तिनें खूप मोठी इस्टेट जमीनजुमला राजेशाही पद्धतीवर उठविला होता. शेअर बाजारांत तिनें मोठ्या रकमा काळजीपूर्वक गुंतविल्या होत्या. आतां उरलेलें आयुष्य ती अमेरिकेंत सुखासमाधानानें घालवीत आहे.

तिचे खास वैशिष्टय ति॑ आजहि राखलेले आहे. ती आपले जीवन अगदीं एकांतांत घालविते. सार्वजनिक भोजनाच्या नृत्याच्या समारंभांत ती चुकूनहि दिसली नाहीं. इतकेच काय, पण, जेवण्यासाठीं म्हणूनसुद्धां ती हॉटेलमध्यें शिरलेली कुणाच्या आढळांत नाहीं.

जॉन गिल्बर्ट बरोबर तिचा विवाह होणार आहे अशा वावड्या एक वेळेस उडत होत्या. त्यावेळेस ते दोघेहि प्रसिद्धीच्या शिखरावर वास्तव्य करीत होते. रुडॉल्फ व्हॅलेंटिनो हा मूक चित्रांच्या काळांत सर्वांत लोकप्रिय चित्रतारा होऊन गेला. तितकीच अफाट अशी लोकप्रियता जॉन गिल्बर्टला लाभलेली असतांना, त्याच्या आवाजांतील दोषामुळें, बोलपटांच्या युगांत हा चित्रतारा स्थानभ्रष्ट झाला. केवळ गार्बोने हट्ट धरला म्हणून 'क्वीन ख्रिस्तीना' बोलपटांत त्याला नायकाची भूमिका देण्यांत आली. हा चित्रपट गाजला म्हणून कांहीं काळ त्याला तग धरतां आली. नंतरच्या बोलपटांत त्याचे संवाद सुरू असतांना प्रेक्षक भलत्याच ठिकाणीं हंसू लागल्यानें त्याला चित्रपटसृष्टि सोडावी लागली. खरें म्हणजे, चित्रपटसृष्टिनेंच त्याला सोडून दिलें असें, म्हणणें योग्य ठरेल. गार्बोच्या निग्रही आणि व्यवहारी मनानें नियोजित विवाह रद्द केला. जन्मभर ती अविवाहित राहिली. वयानें आतां ती साठीच्या उंबरठ्यावर आहे.

स्वीडनमधील स्टॉकहोम शहरांत तिचा जन्म १८ सप्टेंबर १९०६ रोजीं झाला. तिचा बाप त्या शहरांत साधा मोलमजूरी करणारा हमाल होता. भीषण दारिद्र्याच्या शापाबरोबर हमखास आढळून येणारें विपुल संततीचें वरदान त्याला लाभलेलें होतें. इतक्या मुलाबाळांच्या शिक्षणाची सोय कशी लावावी हा प्रश्न महत्त्वाचा नव्हता, तर त्यांना खायला काय घालावें हीच एक मोठी विवंचना असे. सर्व भावंडांत थोरली म्हणून गार्बो वयाच्या सातव्या आठव्या वर्षापासून बाहेरच्या जगांत जाऊन मोलानें कष्ट उपसूं लागली. सोळा वर्षाची गार्बो एका हेअर कटिंग सलूनमध्यें नोकरी करीत असतांना तिच्या आयुष्याला एक वेगळीच कलाटणी मिळाली.

गिऱ्हाईकाच्या दाढीला साबण लावून ठेवण्याची कामगिरी तिला पार पाडावी लागत असे. या विचित्र विनोदी स्वरुपाच्या नोकरीमुळें तिचें भाग्य उदयास आलें. न्हाव्याच्या दुकानांत नाना तऱ्हेचीं गिऱ्हाईकें येणार. एकेदिवशीं मूक चित्रपटधंद्यांतील एक नटवर्य दुकानांत आल्यावर त्यांना या तरतरीत देखण्या पोरीची कींव आली. थोड्याशा खटपटीनें स्वीडनच्या मूक चित्रसृष्टींत गार्बोची 'एक्स्ट्रा' नटी म्हणून भरती करण्यांत आली.

तिथें किरकोळ स्वरुपाच्या भूमिका करीत असतांना मॉरिझ स्टीलर या दिग्दर्शकानें तिच्यामधील सुप्त कला गुण अचूक हेरले आणि त्यानें आपल्या नंतरच्या **'दि सॅगा ऑफ गॉस्टा' बोलिंग'** मूक चित्रपटांत गार्बोला एकदम नायिकेची भूमिका दिली.

तिचा हा चित्रपट विशेषेकरून युरोपांत कसा गाजला आणि हॉलीवूडचें लक्ष या नव्या चित्रचंद्रिकेकडे कसे वेधले गेले हे मी अगोदर सांगितलेलेंच आहे. ●●●






**‘उसळलें हिमगिरिचें आव्हान !’ तें आव्हान स्वीकारून एका वेगळ्या क्षेत्रांत पदार्पण करणाऱ्या ह्या महाराष्ट्र–कन्येचें हे मनमोकळे ( व मनोज्ञ ) आत्मकथन–**

–त्यांच्याच शब्दांत वाचा–संपादक]




–कु. सुधा शांताराम नेरुरकर

**शेरपा-लोक** आपल्या शेरपा भाषेंत बहिणीस म्हणतात “आजी” अन् भावाला म्हणतात “आच्चू”. ते आपापसांत नेपाळी भाषा देखील बोलतात. त्यावेळीं बहिणीला ‘दिदी’ व भावाला ‘दाजू’ म्हणतात.

या शेरपांच्या सहवासांत अतिशय आगळे दिवस अन् रात्रीं गेल्या माझ्या !

शेरपा इतर स्त्रियांचा ‘मेमसाब’ म्हणूनच सहसा उल्लेख करतो. त्यांच्या बरोबर पर्वतारोहण करणाऱ्या मंडळींत बहुधा आंग्ल-स्त्रियाच अधिक. हिंदुस्तानी स्त्रिया आजकालच पर्वतारोहणास बाहेर पडूं लागल्या आहेत.

या थोड्या मूठभर महिलांत आमची सात-जणींची भर आतां पडली आहे. या वर्षीं वीस सप्टेंबरला नवी-दिल्लीहून आम्हीं सातजणी सेंट्रल हिमालयांतील, गढवाल जिल्ह्यांतील मृगथुनी (२२४९० फूट) पर्वत-शिखरांवरील मोहिमेस निघालों तेव्हां एकट्या मिसेस् जॉयीस धनशीथ ह्या इंग्लीश महिलेखेरीज आम्हीं साऱ्या हिंदी स्त्रियाच होतों. खुर्शीद, रानी, उषा, दुर्गा, शारदा व मी.

आम्हीं त्यांच्या दिदी आणि ते आमचे दाजू. ताशी, छुन्झेन्, सोनाम्, आंगफुता, थागपा-गॅलबो, सांग्बू आणि लोपसांग.

ताशी त्यांचा म्होरक्या. ‘सिरदार’ या नांवानें मुख्य शेर्पा ओळखला जातो. ह्या अधिकार-पदाचे सारे आवश्यक गुण ताशी-दाजूंत आहेत. वयानें जेमतेम २९ वर्षांचा ताशी जवळ जवळ दहा पर्वतारोहणांचा अनुभवी आहे.

ताशी दाजू उंचीने बुटकाच आहे. थोडासा स्थूलही. स्वभावानें थंड, अबोल व लाजरा. त्याची नजर शोधक, सर्व कांहीं टिपणारी. त्यामुळेंच त्याचा मजूर व सहकाऱ्यांवर वचक आहे. ताशी कामांत सतत गुंग असतो. मजूरांना रेशन दे, त्यांना सामानाचे बोजे उचलून दे, त्यांतील एकादा अशक्त असला, त्याला चालवत नसलें तर त्याचा बोजा स्वत: उचल, तंबू उचलला तर त्याचे पेग्ज् इकडे तिकडे तर नाहीं ना पडले हें बघ, संध्याकाळ झाली कीं, दिवा-बत्तीची व्यवस्था झाली कीं नाहीं तें पहा, नसल्यास करवून घे. एक ना दोन.

मग जेवून खाऊन जरा आरामांत शेकोटी भोंवतीं आम्हीं जमलों कीं, विसाव्याच्या त्या उबदार क्षणीं ताशी ॲल्युमिनियमची तपकिरीची चार इंची बाटली काढतो, चिमूटभर बोटांत घेऊन नाकांत भरतो आणि जबाबदारीच्या ओझ्याला थोडा वेळ दूर ठेवितो !

त्याचा आकाशी फेदरकोट, गुलाबी रंगाचा स्वेटर, क्रिकेटर घालतात तसली पांढरी किंवा जपानी पद्धतीची बसकी टोपी कुठूनही ओळखूं येतात.

त्याचे बूट छोटेसे आहेत. सकाळीं उठल्याबरोबर ॲअर-मॅट्रेस वरील स्लीपींग–बॅगमध्यें बसलेल्या पोझमध्यें ताशीला बघावा. एकाद्या गोट्या मुलासारखा निरागस. त्याचे केस विस्कटलेले नसतात, तरीहि बोटें फिरवून तो केस सारखे करील. त्यांवर टोपी चढवील.



अनुक्रमणिका

उशागतीचे बूट पायीं घालील. हात लांबवून एअर–मॅट्रेसची उशीची बाजू चांचपील. फुस्स् करून ती मोकळी करील. मिनिटभरांत त्याची एअर-मॅट्रेस हवा काढून सपाट होईल. सराईत बोटें वाड-बिस्तरा गुंडाळून घेतील आणि त्याची पथारी हां हां म्हणतां रूकसॅकमध्यें गडप होईल !

त्याचें उठणें-बसणें व सारे कसें डौलाचें ! ताशी बर्फावर अशा कांहीं रुबाबांत चालतो, जसा वनराजाच जणूं निघालाय अरण्यांतून ! मान वेळावून, क्षणभर थबकून, खालीं किंवा सभोंतालीं ताशीनें नजर फेंकली कीं, गर्दन झुकवून एकादा सिंहच जणूं आपल्यां राज्याचें अवलोकन करीत आहे, असें वाटतें ! पहाडी लोकांचा जन्मजात लवचिकपणा त्याच्या नसानसांतून खेळतो.

कमरेपर्यंत बर्फात तो गेला तरीही सहजपणें ताशी वर येतो. मासा जसा तळाकडून सुरंकन् उसळी मारून पृष्ठभागावर अलगद् विनासायास येतो तसा !

ताशी रागावला कीं, कुणाचाही मुलाहिजा मग ठेवीत नाहीं. अर्थात् असे प्रसंग फारच थोडे. सर्वात् जास्त डोकें उठवलें त्याचें पोर्टर-लोकांनीं !

"असे गुणाचे लोक कधीं नाहीं पाहिले बुवा !" हे उद्‌गार त्याच्या तोंडून वारंवार निघायचे आमच्या मृगथुनी पर्वतारोहणाच्या मोहिमेंत. आणि कुणाच्याहि सहनशीलतेचा अंत पाहावयास लावणारीच तीं माणसें होती ! एकदम कामचुकार अन् बेफिकीर !! मृगथुनी पर्वत उतरून 'लता' या सडक रस्त्याला असलेल्या गांवीं येईपर्यंत अर्धे रक्त आटविलें बेटयांनीं ताशीचें !

एकादा हट्टी व आडदांड जनावरांचा कळपच जणूं तो हांकलीत होता ! कधीं चुचकारून घे, तर कधीं धांवपळ करून त्यांच्या शेपट्या पिरगाळून त्यांना नीट चालावयास लाव, असें जरब बसवणारें तंत्र ताशीनें आत्मसात् केलें अखेरीस !

ह्या आळशी लोकांना बाबापुता करून त्यांच्या पाठीवर एकदां बोजे त्यानें चढविले, कीं दुसरा पडाव येईपर्यंत त्याची व पोर्टरांची रस्सीखेंच चाले. ते आपले मख्खपणें बसून राहात. सिगरेट मागत. वरें वाटत नसल्याचा देखावा करीत. बोजा जड असल्याची तक्रार करीत. आणि पुन्हां कॅंपवर आल्यावर रेशन कमी आहे म्हणून भांडण करीत. तें घ्यावयास वेळेवर येत नसत. आलेच तर गरम पाणी द्या, अमुक द्या, तमुक द्या असें निर्लज्जपणें मागत.

मग ताशी चेहरा गंभीर ठेवून आपल्या सोबत्यांपैकीं एकाला हुकूम सोडी, "अरे, साहेबांना गरम पाणी दे बरं !" त्याची आज्ञा शिरोधार्य मानून छुन्झेन् स्वयंपाकी रिकामी बादली पोर्टरपुढें आदळून कुत्सितपणें री ओढायचा. "साहेबांनीं थोडी तसदी घ्यावी. पल्याडच्या ओढ्यावरून बादली आणली कीं, गरम पाणी तयार करूनच देतो कीं मग !"

मग सारे शेर्पा-दाजू हां हां करून हसूं लागत ! हंसायचा नाहीं एकटा छुन्झेन् साऱ्या पोर्टर लोकांनीं त्याला 'हे दे, ते दे' असें मागून त्याचे माथें भडकावलें होतें अगदीं पहिल्या दिवसापासून ! आपल्या भाषेंत तो तक्रार करीत सांगायचा "कोओी अेक मोग छाय ना ! थाली छाय ना ! बरतन छाय ना ! चा दिया पाछी मोग छाय ना ! खाना दिया थाली छाय ना ! " अशा या नन्नाचा पाढा वाचणाऱ्या आमच्या पोर्टरांवर तो मग चिडून "नो-नो" असं इंग्रजींतून रागावयाचा !

बाकी तो कधींही चिडत नाहीं. त्याच्या चेहऱ्यावर राग शोभतच नाहीं. छुन्झेन्चा चेहरा पाहिला कीं, मिळून आलेल्या वरणाची आठवण येई मला ! छुन्झेन् म्हणजे साक्षात् अन्नपूर्णा ! त्याचें नांव लक्षांत रहायला अन् तोंडांत घोळायला मला एक-दोन दिवस त्रास झाला तेव्हां मी त्याला सरळ 'टुन् टुन्' म्हणत असें. चुलीवर रटरटणाऱ्या वरणासारखा खदखदून हंसायचा तो ती हांक ऐकल्यावर !

जसजसे दिवस गेले तसे 'छुन्झेन्' हें नांवही मी सोडून दिलें व 'छुन्झे-माँ' हें सार्थ नांव वापरूं लागले. थोड्याच अवकाशांत 'छुन्झे-माँ' नांव इतर दाजू व पोर्टर्सच्याही तोंडीं झालें.

सर्वांत कष्ट पडावयाचे त्यालाच. सोळा हजार पांचशें फूटावरील 'त्रिदंग' नांवाच्या बेस-कॅंपवर आम्हीं आलों तीन ऑक्टोबरला. चोवीस सप्टेंबरपासून

**बर्फाचे तट पार कराया ।**
**हव्या उमेदी उरांत मोठ्या ॥**



द्रिब्रगेट्टा ( ११४०० फूट ) व देवडी ( १११९० फूट ) यांतील कठीण कडे पार करतांना–( ल्हकबा, जयल्बू, दुर्गा व पोर्टर्स )

आमची रोज पायपीट चालायची. मधले पांच दिवस मुसळधार पावसानें पार फुकट घालवले होते "लता-खरक" या ठिकाणीं. Trekking च्या त्या दिवसांत ही माऊली रात्रीं दोन वाजतां उठून कामाला लागावयाची ते दिवसभराचें काम आटपून रात्रीं दहा वाजेपर्यंत !

पहांटे साडेपांचला सार्‍यांना "पलंगचा" (बेड-टी) दे, ब्रेकफास्ट-कम-लंच बनव, भांडी-कुंडी घांसून पुसून बांधून पोर्टरांच्या पाठीं दे, सगळी आवराआवर करून सर्वांमागून कँप सोडून जलद गतीनें चालून पुढचा पडाव सर्वांआधीं गांठ, चूल मांडून चहा बनव, बिस्किटें दे आणि पुन्हां संध्याकाळीं साडे सहाच्या आंत गरमा गरम रुचकर जेवण बनव. "खाना रे ऽ' ('रेडी'-तला शेवटचा शब्द अध्याहृत !) अशा त्याच्या विशिष्ट लकबीनें आवाज दे आणि आम्हीं सारे जमलों कीं, प्रथम सर्वांना सूप, तेंही गरमा-गरम !! मग खिचडी किंवा डाळभात, भाजी यांपैकीं जें कांहीं बनविलें असेल ते पदार्थ तो आमच्या थाळ्यांत मुक्त हस्तें वाढीत जाणार. अगदीं पहाडांतल्या अवखळ ओढ्यासारखा ! तुमच्या 'बस्स ! पुरे !!' ह्या शब्दांना तो कधींच दाद देत नसे.

मग वाढून झाल्यावर मंडळी खाण्यांत गुंग झाली कीं, हा पायाची जुडी करून, गालांवर उजवी बोटें टेकवून डावा हात जेवणाच्या भांड्यांवर ठेवून, कुणाची थाळी केव्हां कमी होते आणि ती आपण कधीं भरतो, अशा एकाग्रतेनें बसून राही !



अगदीं आईसारखा. तीच मायेपोटीं उत्पन्न झालेली काळजी आणि तोच प्रेमापायीं व्यक्त झालेला व्यग्र-भाव !!

आमच्या जेवणानंतर तो त्याचा जपानी गिर्यारोहकांनीं त्याला बहाल केलेला लंच-बॉक्स काढी. "जंगल का चमच" म्हणून सरपणाच्या लांकडाचा एक तुकडा त्याचा चमचा होई. नसल्यास नुसत्या बोटांनीच घांस घेई.

छुन्झे-मांचें जेवण कांहीं दिवसांच्या आंत आमच्या 'कंट्रोल'खालीं आलें. त्यावरोबर त्यांचें वाढपही ! कारण त्याच्या सढळ वाढण्यापायीं त्याचेंच पोट पुष्कळदां रिकामें राही हें आम्हां दिदी-लोकांना जेव्हां समजलें तेव्हां साहजिकच छुन्झेन्नें स्वत:साठीं राखून ठेवलें आहे कीं, नाहीं हें आम्हीं बघूं लागलों.

आमची व छुन्झेन्ची रोज प्रश्नावली चाले.

"छुन्झे-मां, खाना खाया ?"

"हा ऽ !" अगदीं लाघवी सुरांत त्याचें उत्तर यावयाचें.

"क्या खाया ?"

"शॉव खाया !"

"नाम लेकर बोलो !" मग तो आठवल्याचा अभिनय करावयाचा.

"भूल गया !"

"भूल कसा जातोस ! तें कांहीं नाहीं. सांग जल्दी." अर्धवट हिंदी-मराठी शब्द वापरत उलट-तपासणी चालूंच ठेवावी लागावयाची. आमच्या आविर्भावानें छुन्झे-मां एकदम हंसायचा आणि त्याच्या हंसण्यानें आम्हीं अर्धे खलास होऊन जात.

"हां, बोलो ! खिचडी खाया ? रोटी लिया ? सूप पी लिया ?" प्रत्येक प्रश्नाला तो व्यवस्थित मान डोलावून होकार देई.

'मेला कधीं सांगणार नाहीं' म्हणत आम्हींच गप्प बसूं शेवटीं.

अखेर आम्हीं एक युक्ति काढली. शारदा त्याच्याबरोबर जेवायला राहूं लागली. मी शेर्पांना वाढूं लागलें. सात प्लेटस्, सात मग्ज्, सात चमचे निराळे काढून ते व्यवस्थित भरून मग सर्व शेरपा-दाजूंना वाढतांना जेवणाची चव अधिकच वाढे. 'थोडा लो' 'इतनासा लो' असें मी आग्रहानें म्हणावें, 'ना, ना' 'खूब हुआ' असें त्यांनीं म्हणावें. प्लेटस्वर हात पसरावा. माझ्या अजीजीच्या स्वरानें विरघळून थोडेसें पुन्हां प्लेटमध्यें घ्यावें, अशा घरगुती वातावरणांत जेवण व्हायचें.

जेवण झालें रे झालें कीं छुन्झेन् मग एकदम कामाच्या जबाबदारींतून मोकळा व्हायचा. सिगरेटचें पाकीट खोलून एकापाठीं एक अशा सिगरेटस् ओढायचा. मध्येंच ठसकायचा. आणि पुन्हां कामाला लागावयाचा.

सोळा हजार पांचशें फूटांवरील "त्रिदंग" या बेस-कँपला आम्हीं १६ दिवस होतों त्या अवधींत त्यानें आपलें उघड्यावरील स्वयंपाकघर किती कष्टानें उभारलें होतें !

पहिल्या दिवशीं चार धोंडे गोळा करून चूल पेटविली. त्याच्या आसपास दगडांची रास उभारून वरती छत घातलें. रिकामीं खोकीं कोपर्‍यांत रचून त्यांवर चहा-साखर–कोको–दूधाच्या पावडरीचे डबे इत्यादि ओळीनें लावून घेतले.

सरपणाला एक कोंपरा राखून ठेविला. स्वयंपाक करतांना हाताखालचा एक फडका, अन् प्लेटस् वगैरे पुसण्याचा दुसरा फडका, असे दोन टॉवेल्स त्यानें काळजीपूर्वक वापरले. आम्हीं स्वयंपाकघरांत लुडबूड करून त्यांची गल्लत तर नाहीं ना करणार या काळजींतच विचारा असायचा !

छुन्झे-मां जीवापलीकडे जपायचा प्रेशर–कुकरला. त्याला सर्व शेर्पा-दाजू 'फुसुकुका' या नांवानें ओळखत.

हें 'फुसु कुका' प्रकरण समजून घ्यायला प्रथम बराच वेळ डोकेंफोड करावी लागली. नव्या दिल्लीला आम्हीं सर्व सामानाचें पॅकिंग करत असतांनाची गोष्ट.

'फुसुकुका किधर है ?' असें त्यानें विचारलें. मला काकाकुवा पक्षी ठाऊक. 'फुसुकुका' नांव कानीं पडलें तेव्हां वाटलें हा कोणता पक्षी ? आणि करायचा काय तो मृगयुनी पर्वत चढतांना ? आमच्या चेहर्‍यावरील गोंधळ पाहून छुन्झेन् मोठ्या गंभीरपणें सांगू लागला. त्याचें तीन चतुर्थांश नेपाळी व उरलेलें हिंदी स्पष्टिकरण यापेक्षां








त्याच्या हातवाऱ्यांनींच मग आम्हीं 'फुसुकुका' काय तें समजलों. तोंडानें 'फुऽऽस्' असा आवाज करून त्यानें प्रेशर-कुकरमधून वाफ बाहेर जाते वगैरे प्रेशर-कुकरचें वर्णन ऐकवतांच आम्हीं त्याचें 'फुसुकुका' हें सार्थ नामाभिमान कायम ठेवलें !

छुन्झे-मॉनें त्याच्या या फुसुकुकांतून कितीतरी रुचकर पदार्थ शिजवून आम्हांला खाऊं घातलें. प्रत्येक सुगरणीची 'स्पेशल-डिश्' असते, तद्वत् त्याची खिचडी ! जवाब नहीं !! अन् त्याच्या जोडीला कांदा-लसूण-चिंचा यांनीं वनविलेली मसालेदार चटणी !!

बाकी कांहीं गोष्टी पहाडांतील जीवनांतच शोभून जातात. त्या खिचडी-चटणीची सर मुंबईतील सपाटीवर कुठली यायला ! आणि हो. तें सारें बनविणारा सिद्धहस्त छुन्झेन्ही कुठें इथें !

छुन्झेन्च्या बरोबरीनें सोनाम्–दाजू कामाची अशीच उस्तवार करीत रहावयाचा. सोनाम्–दाजू म्हणजे सोन्याचा तुकडा होता! ताशी शेर्पा-दाजूंत हिऱ्यासारखा चमकायचा तर छुन्झेन् तन्मणीसारखा झळकायचा. सोनाम् माझा 'गार्डियन एंजेल' !!

सोनाम् बुटकासा. लहान चणीचा. उंचनिंच छुन्झेन् पुढें स्वारी बटु-वामन-मूर्ति दिसे. फेदर-कोटची त्यानें मुंडासेवजा टोपी बनविली होती. कपाळावर टिळा लावला तर विठोबाच्या वारकऱ्यासारखा दिसला असता सोनाम् दाजू !

सोनाम् निरक्षर आहे. परंतु पहाडी विश्वविद्यालयाचा डॉक्टरेट आहे. दिशा शोधून योग्य मार्गानें जाण्यांत त्याचा कुणीही हात धरूं शकणार नाहीं अलम दुनियेंत असा माझा दावा आहे !

चोवीस सप्टेंबरचा तो दिवस मी कधींच विसरणार नाहीं. पाठीवर सकाळीं रुकसॅक मारून आमचा "लता" गांवापासून पायीं प्रवास सुरूं झाला अन् पावसानें आम्हांला अगदीं खिंडीतच गांठलें एक-दोन तासांत ! "लता" आहे आठ एक हजार फूटांवर. आमचा तळ पडणार होता "लता-खरक" या बारा हजार फूट उंचीवरील ठिकाणीं. सारी उभी चढण. पावसानें चिखल झाला. थंडीचा कडाका वाढला. मजूर लोक आधींच उत्साही ! त्यांत पावसाची भर. मग काय ? अर्ध्या रस्त्यांवर मोठमोठ्या खडकांच्या कपारींतला आडोसा घेऊन ते शेकोटी पेटवून कोंडाळें करून जे ठिय्या देऊन बसले ते मुळीं पुढें हलण्यासच तयार होईनात. त्यांची समजावणी करून त्यांना पुढचा मार्ग काटण्यास एकदांचे पिटाळलें तेव्हां संध्याकाळचे पांच वाजून गेले होते. प्रकाश झपाट्यानें कमी होत होता. अर्धी चढण चढून जावयाची होती.

सकाळपासून चालून चालून पाय तुटले होते. रेनकोटचा स्वीमींग-सूट झाला होता. रुकसॅकचें वजन क्षणाक्षणाला वाढत चाललें. डोळयांत प्राण आला. पण तो रस्ता कांहीं संपेना. पाऊस कांहीं थांबेना. आणि आमचा पडाव कांहीं दिसेना.

प्रकाश केव्हांच लुप्त झाला होता. वादळ आणि अंधारलेला रस्ता यांतून ठेंचाळत जातांना सोनाम् एकाद्या दीप-स्तंभासारखा आधार देत राहिला आम्हांला. तोंडानें अवाक्षर न काढतां बॅटरीच्या झोतांत तो पुढें जाई, आमच्या व पोर्टरांच्या थकलेल्या अन् लटपटत्या पायांना खालील रस्ता दिसेल अशा बेतानें बॅटरीचा प्रकाश मागें फेंकी. साडे-आठच्या सुमारास आम्हीं "लता-खरक"ला येऊन पोहोंचलों तें केवळ सोनाम्च्या दिशांबद्दलच्या ज्ञानामुळेंच.

पुढें चार दिवस पावसानें चांगलेंच झोडपून काढलें आम्हांला, त्यावेळीं आम्हीं सर्व मेमसाहेबा खलास झालों होतों. पण आमचे शेर्पा-दाजू जणूं स्वच्छ सूर्यप्रकाश पडला आहे अशा थाटांत बिनबोभाट व्यवहार करीत होते !

"गुट मॉनिंग" म्हणून तंबूचें दार उघडून हंसऱ्या मुखानें सोनाम् किंवा सांग्बू आम्हांला झोंपेंतून उठवावयाचे. स्लीपींग-बॅगमधून झीपची सांखळी ओढून आम्हीं मिटलेल्या डोळयांनींच "गुड-मॉनिंग" म्हणावयाचा अवकाश, हे देवदूत आमचे मग्ज् गरम चहानें भरत, 'बरसात कम नहीं हुआ ! सो जावो ! आराम करो दिदी !' असें म्हणत अदृश्य होत. दुपारीं लंच वगैरे आणीत. खरकट्या थाळ्या नेत. स्वच्छ करून आणीत. चार वाजतां चहा बिस्किटें आणीत. पुन्हां रात्रीचें जेवण !

आम्हां सात जणांची केव्हढी निरपेक्ष सेवा ! कोणी शिकवली त्यांना ही निःस्वार्थी कर्तव्य-परायणता ? पहाडांनीं ? पर्वतांनीं ?

हा सारा कामाचा अचाट उत्साह सोनाम्च्या पहाडी गीतांतून नेहमींच व्यक्त होतो. पण स्वारी भारी लाजरी बुजरी. कितीही विनवण्या केल्या तरी तो आम्हांला एकही गाणें ऐकवणार नाहीं. तो स्वतःच्या नादांत काम करतांना गाण्याच्या लकेरी

## सीता–स्वयंवर

ऐका हो ऐका जो कोणी ही चपाती एका दमांत मोडून दाखवील त्यालाच सीता माळ घालील.



## मृगजळ

दूर वाहता वाहता
प्रवाहात दुरावलो
खोल चरगारे आत
रितेपण सरावलो

कधी तरी कोमलेल्या
नजरा या भेटतात
फूल अगतिक एक
थरारते पाकळयात

स्वप्नामधला तो गाव
स्वप्नातच हरवला
अंतरंगातला भाव
अंतरीच जिरवला

तुडविता वाळवंट
डोळयापुढें या व्याकुळ
फक्त पुढच्या जन्माचे
झगमगे मृगजळ

–वृंदा लिमये

ऐकल्या कीं, हटकून समजावें ही सोनाम्‌ची स्वारी गातेय बरं !

सोनाम् हरहुन्नरी आहे. तंबूची डागडुजी, बिघडलेला पेट्रोमॅक्स, नेहमीं दगाफटका देणाऱ्या स्लीपींग-बॅगच्या झीप-सांखळच्या, ह्या साऱ्यांची तो चोख व्यवस्था लावील. त्याचे हात कुठल्या ना कुठल्या कामात हमेश गुंतलेले असतात आणि तोंडांत नेपाळी लोक-गीतांचे शब्द व सूर.

त्याला असें कामांत गुरफटलेले पाहिलें कीं, वारंवार मला लहानपणीं पाहिलेल्या 'भक्तीच्या मळयांत'ल्या 'कांदा-मुळा-भाजी अवघी विठाबाई माझी' म्हणणाऱ्या सांवता-माळयाची आठवण येई !

पाठीवर रुकसॅक घेऊन गाण्यांच्या लकेरी घेत सोनाम्-दाजू डोंगरांची चढउतार इतक्या सहजतेनें करतो जणूं अस्मानांतून बुलबुलच भराऱ्या मारीत चालला आहे आपल्याच नादांत !

"देवोडी" (११११० फूट) ह्या मुक्कामापासून आम्हीं "बेथारथोली" (१२५४० फूट) या बेसकॅंपच्या वाटेवरील टप्प्याकडे निघालों तेव्हां ताशी-दाजूनें सामानांचे बोजे जास्त झाल्यानें त्यांतील कांहीं पेट्या खडकांच्या आडोशाला लावून ठेविल्या व आम्हीं पुढें निघालों. कामाच्या धांदलींत छुन्झेन्‌नें मिठाची पोटली व दुसरें असेंच कांहीं, दिलें त्या सामानांत टाकून. बेथारथोलीला पोहोंचल्यावर रात्रीं छुन्झेन्‌च्या लक्षांत आलें कीं, उद्यांसाठीं जेवणांत 'रुक्मिणी' नाहीं ! परत मागें जाऊन त्या आवश्यक वस्तु आणण्यासाठीं पहाटेंच उठून सोनाम्-दाजू निघाला. बरोबर धनबहादूर नांवाचा तिबेटी मजूर घेतला. आम्हीं उठण्याआधीं तो निघूनही गेला होता. दुपारीं बारा वाजतां तो बेसकॅंपच्या वाटेवरच येऊन मिळाला. त्याची हळदी रंगाची रुकसॅक मला जेव्हां डोंगर चढतांना दिसली तेव्हां मी केव्हढया आनंदानें टाळया पिटल्या ! 'सोनाम्-दाजू जल्दी आवो !' माझ्या हांकेला प्रतिसाद म्हणून त्यानें विशिष्ट पहाडी 'आवाज' दिला. हो-होहात हालविला आणि आम्हांला येऊन मिळाला हां हां म्हणता.

"दाजू, आप पंख लगाके उडते है ?" मी त्याला आश्चर्यानें विचारलें. तेव्हां त्यानें आपल्या दोन्हीं पायांकडें फक्त अंगुलि दाखविली.

ह्याच जलदगतीनें सोनाम्-दाजू बेसकॅंपवरून (१६५०० फूट) अठरा हजार फूटांवरील कॅंप नं. १ वरील मंडळींना पराटे, पॅटीस इत्यादि त्यानें व छुन्झे-मॉनें बनविलेले पदार्थ, तसेंच काजू, बदाम, चॉकलेट व इतर डीहायड्रेटेड आणि टिनफुड, औषधें, चिठ्ठया-चपाटया घेऊन जावयाचा, पोंचवायाचा आणि परतायचा. कधींही कुरकुर नाहीं. कंटाळा नाहीं. आळस नाहीं.

हा त्याचा कामाचा उरक आणि समज माझ्यावर फार खोल परिणाम करून गेला आहे.

मला आठवतें मी, शारदा, आंगफुता व सोनाम् असें चौघे मिळून जेव्हां वीस हजार फूटांवरील कॅंप नं. २ पासून मृगथुनी-शिखरांवर जाण्याचे बेत करीत होतों, तेव्हां शिखरांवरून कॅंपकडे परतल्यावर गरमागरम चहाची व्यवस्था कोण करील असा प्रश्न पडला. आम्हां चौघांखेरीज इतर मुली व शेर्पा त्याच दिवशीं कॅंप नं. १–कडे रवाना झाले होते. शिखराकडे जाण्याचा खडतर प्रवास आटपून परतल्यावर गरम चहाचा घोट म्हणजे संजीवनीच असते मृतवत् गात्रांना ! सोनाम्‌नें तो प्रश्न ऐकला मात्र, पटकन् बोलला, "मैं रहूँगा पीछे ! आप जाईये ! अच्छा गरम सूप रखूँगा।"

स्वार्थ नाहीं. यशाची हपापी नाहीं. फक्त दिदी–लोकांची काळजी !

"तुला एकटयाला टाकून शिखरांवर काय दिवे लावणार आहोंत आम्हीं ! तूं नाहीं तर आम्हीं नाहीं जात वर !" मी त्याच्यावर जवळ जवळ ओरडलेंच. रागानें नव्हे. त्याच्या ममतेपुढें हतबुद्ध होऊन !

सोनाम् तसा मोठा मिस्किल आहे. छुन्झेन्‌सारखा अघळपघळ नाहीं. त्याच्या बोलण्यापेक्षां त्याचें हंसूंच जास्त बोलकें. एकदम बालकवींच्या निर्झरासारखें ! निरागस, निष्कपटी !!

तो व छुन्झेन् स्वयंपाक-घरांत कणीक तिवतांना, खिचडी पकवतांना किंवा चहा बनवतांना हमेश विनोद करून आपापसांत हो हो करून हंसत. आमचा एक केदारसिंग नांवाचा गढवाली पोर्टर होता. बेटयाच्या लग्नाच्या ओळीनें सहा "बायली" झाल्या ! पण सर्वजणी त्याला टाकून पसार झाल्या कुणाना कुणाचा हात धरून ! अशा या टाकलेल्या केदारसिंगला सोनाम् जेव्हां 'ए बुडा ऽ' म्हणून पुकारायचा तेव्हां केदारसिंग जाम तापायचा ! आणि तो चिडतो म्हणून सोनाम्‌ही 'ए बुडा' म्हणतांना हळूंच हंसायचा !

सोनाम्‌ची नजर घारीसारखी तीक्ष्ण. नजरेतून कांहीं देखील सुटणार नाहीं. तुम्हीं थकलांत तर त्याचे पाय आपोआप तुमच्या चालीनें जाऊं लागतील. चढतांना किंवा उतरतांना तोल गेला तर चटकन् त्याचे बळकट पंजे तुमचा तोल सांवरतील.

तुमचे इंग्रजी Thank You शब्द फार थिटे पडतात सोनाम्‌च्या सहज सौजन्याच्या सातत्यापुढें !

आम्हां प्रत्येकीचा Mug, चमचा, थाळी, थर्मास त्याला माहीत आहे. रुकसॅक ठाऊक आहे. त्यांतल्या आंतल्या व बाहेरच्या पॉकेटस्‌मध्यें काय आहे तें त्याला पाठ आहे. जेवतांना कुणाचें पान कोणत्या गोष्टीनें कमी आहे हें जेवणारा तोंड उघडून बोलायच्या आधीं त्याला माहीत असतें. डाळ कुठें, तांदूळ कुठें, पीठ-मीठ-मिरची कुठें, मेणबत्त्या कुठें, एक ना दोन, सारें कुठें आणि कसें तें त्याला व्यवस्थित ठाऊक असतें.

ओठांत जळती सिगारेट ठेवून व दोन्हीं हातांनीं चुलीवरील आधणांची भांडी सहज लीलया उतरवून तो शींग (सरपण) आंत सरकवील, जाळ करील, 'एऽबुडा' म्हणत केदारसिंगला ढकलून देईल, आपण स्वतः कुठे तरी देहाची जुडी करून बसेल आणि आम्हांला सांगेल, "दिदी घ्या जरा आगी जवळ सरकून–बहु थंडा है आज !" (पूर्वार्ध)

●●●










## महालक्ष्मीची पूजा

गुंडोपंतांचा बंडचा पुण्याच्या कॉलेजांत शिकायला होता. गुंडोपंतांकडे दरवर्षी महालक्ष्मीची पूजा होत असे. "पुढल्या रविवारीं महालक्ष्मीच्या पूजेला यायला तुला जमेल कां?" गुंडोपंतांनीं बंडचास पत्र लिहून विचारलें.

तें आपल्या मित्राचें गुप्त लिपींत लिहिलेलें पत्र आहे अशा समजुतीनें बंडयानें विसरतेपणीं तार केली–

"येऊं शकत नाहीं. टॉप घोडयावर माझ्या नांवें वीस रुपये लाव."

* * *

## सूट नाहीं ग, नवराच

"तुझ्या नवऱ्यानें नवीन सूट घातलाय का ग?" मीनाटुमारीनें वधूबालेस विचारलें.

"नाहीं," वधूबाला म्हणाली. "कां?"

"नाहीं, तो निराळा दिसला म्हणून विचारलं", मीनाटुमारी म्हणाली.

"दिसणारच," वधूबाला म्हणाली. "अग नवराच नवीन आहे तो."

* * *

## ठोसा परेड

आपल्या फुटलेल्या थोबाडाबद्दल गुंडोपंतांनीं केलेला खुलासाः–

"दारासिगासारखी बॉडी असलेला एक माणूस मला भेटला. 'माझ्या ठोसा-परेडमध्यें तुमचा नंबर पहिला आहे.' असं तो मला म्हणाला.

मग त्यानें मला ठोसा मारला."

* * *

## पत्ते आणि घोडे

पत्त्याच्या जुगारांत दर्वी असलेला एक माणूस एकदां रेस खेळायला गेला आणि जवळचे सर्व पैसे गमावून बसला.

"पुन्हां इकडे येण्यापूर्वी," तो स्वतःशींच म्हणाला, "घोडे पिसायचे कसे तें शिकून यायला पाहिजे."

* * *

## कमाऽल झाली बाकी तुमची

"अरे, हें ब्लेड असं काय झालं एकदम? दाढी होतच नाहीं मुळींच."

"अय्या! म्हणजे कमाऽल झाली बाकी तुमची. अहो काल संध्याकाळीं मी पेन्सिल तासली त्यानं आणि तुमची दाढी व्हायला काय झालं मेलं?"

* * *

## धूर्तपणा

ढोलंकाकू वजनाच्या कांटयावर उभ्या राहिल्या. डॉक्टर साहेबांनीं वजन पाहिलें, मग क्षणभर विचार केला, मग ते म्हणाले, "माझ्या चार्टप्रमाणें तुमची उंची सहा फूट दहा इंच तरी असायला पाहिजे."

# पान पुरी

चुरचुरीत, खुसखुशीत आणि खमंग फरसाण

## अजून बच्चा आहेस तूं

"काल मी घरीं गेलें," माधव गुंडोपंतांना म्हणाला, "तेव्हां माझी बायको हंसत हंसत मला सामोरी आली. मला तिनें अेक गोड चुंबन दिलें. खायला सुद्धां केलं होतं तिनें. तुमच्या नशिबांत आहे का असलं कांहीं?"

"गुंडोपंतांनीं जांभई दिली. "मग तिची नवी साडी तुम्हांला आवडली कीं नाहीं?" त्यांनीं विचारलें.

* * *

## रक्त फार थोडं आहे

सारा जन्म बाटलीच्या नादांत घालविलेल्या गुंडोपंतांची डॉक्टरांनीं काळजीपूर्वक तपासणी केली आणि आपला निकाल दिला.

"तुमच्या मद्य–वाहिन्यांमध्यें रक्त फार थोडं आहे."

* * *

## कंपनी

मालती मालिनीला म्हणाली, "त्याची कंपनी अगदीं कंटाळवाणी वाटते ग, पण त्याच्या मालकीची कंपनी आहे ना, ती फार मोठी आणि चांगली आहे."

—वि. रा. भाटकर

## चिडणार कशावर?

एकदां एका कॉलेजचा संघ परगांवीं फुटबॉलचा सामना खेळण्यास गेला. जातांना कॉलेजांत नसलेला पण उत्कृष्ट खेळणारा असा गांवातला एक खेळाडू त्यांनीं बरोबर नेला होता. त्या खेळाडूच्या खेळामुळें त्यांनीं सामना जिंकला. परगांवच्या कॉलेजला ही लबाडी कळली तेव्हां त्यांनीं इकडच्या प्राचार्यांकडे तशा आशयाचे पत्र लिहिलें. सामना जिंकल्यामुळें प्रथम खूष झालेल्या प्राचार्यांनीं संघाच्या कर्णधाराला बोलावलें, प्रथम सामना जिंकल्याबद्दल अभिनंदन केलें. नंतर त्याच्या लबाडीबद्दल कानउघाडणी केली. व टेबलावर मूठ आपटत ते गरजले,

'सर–वुइ प्लेड इट ऑन दी फूटबॉल ग्राउंड सर.' तो कर्णधार चाचरत म्हणाला. आतां त्याच्या ह्या कृत्यावर चिडावे कीं इंग्लिशवर चिडावें हेंच प्राचार्यांना कळेनासे झाले.

–माधव अत्रे



सुनेला दिवस राहिले कीं, सासूला आनंदाचं उधाण येतं. नातवंडाच्या बारशाचा सोहळा तिच्या डोळ्यांत नाचूं लागतो, हा झाला नियम !!.... पण कधीं कधीं.................

—यशवंत दिनकर फडके



"**संजय** अत्यवस्थ; तावडतोब या." मेहुण्यानं पाठविलेल्या तारेत एवढाच मजकूर आहे. यावरून काय समजायचं ? संजय खरोखरच अत्यवस्थ आहे कीं, त्यानं या जगांतला आपला जेमतेम पांच महिन्यांचा मुक्काम संपवला आहे अचानक ? संजय गेला असं कळवलं तर मला धक्का बसेल म्हणून तर मेहुण्यानं तो अत्यवस्थ असल्याचं मला कळवलं नसेल ? शक्य आहे. बहुधा असंच असणार ! मेहुण्याला वाटलं असेल, एकाएकी आजारी पडून संजय गेला असं कळवायचं कसं मला ? खरं म्हणजे संजयला मी अजून एकदांहि पाहिलं नाहीं. पण मुलाची तब्बेत चांगली असल्याचं त्याला पाहिलेली सगळी मंडळी सांगतात. संजयची तब्येत उत्तम आहे. त्याला पुढं सरकायला यायला लागल्यापासून तो घरभर फिरतो, तो माणसं कशी ओळखू लागला आहे याचं सविस्तर वर्णन करणारं सुमतीचं पत्र आजच सकाळच्या डाकेनं आलं आणि तें वाचून तर ऑफिसमध्यें आलों मी ! मघाशीं एका प्रकरणावर चर्चा करण्यासाठीं साहेबांच्याकडे गेलो होतो. "छोकरा काय म्हणतो ?" म्हणून त्यांनीं विचारलं तेव्हां "मुलाची तब्येत ठणठणित आहे. सरकायला लागला आहे" असं मीच नव्हतं कां सांगितलं त्यांना ?

मुलाच्या प्रकृतीची काळजी करूं नका, दिवसभर खेळतो आणि रात्रीं स्वस्थ झोंपतो असं सासऱ्यांनींहि कितीतरी वेळा लिहिलं आहे आणि तरीहि असं कांहींतरी होणार असं मला सुमतीला दिवस गेले तेव्हांपासून वाटतं आहे. अशी एखादी घटना घडणार आज ना उद्यां असं बरेच दिवस माणसाला वाटत असलं आणि मग तसं खरोखरच घडलं कीं, माणूस अटळ म्हणून निमुटपणें जसा त्याचा स्वीकार करतो, तसं कांहींसं माझं झालं आहे. मेहुण्यानं केलेल्या तारेतल्या मजकुरावरून संजय गेला असेलच असं नाहीं म्हणतां येणार ! कदाचित् खरंच तो अत्यवस्थ असेल. पण आजारातून वांचेलच असंहि नाहीं. संजय कदाचित् गेला असेल किंवा तो जाण्याची शक्यता असेल.

तारेतल्या मजकुरावर मी पुन्हा पुन्हां नजर फिरवीत राहतो. ते पाहिल्यामुळं असेल कदाचित् शेजारच्या टेबलावर काम करणारा सावंत माझ्याकडं येतो आणि म्हणतो, "काय झालं रे कुळकर्णी? कुणाची तार ?" मी कांहीं न बोलतां त्याच्या

हातीं तार देतो. तो तार वाचून मला धीर देण्यासाठीं म्हणतो, "डोंट वरी. होईल सगळं ठीक. अरे, लहान मुलं असं घाबरवतातच. दोन तीन दिवसांत खेळायला लागेल. पण तूं मात्र नीघ लगेच. दुपारीं तीनची पंजाब मेल मिळेल बघ." एवढ्यांत सेक्शनमधले सारे सहकारी गोळा होतात. सहानुभूति दाखवतात. दिलासा देतात. टेबलावर अस्ताव्यस्त पडलेल्या दोन-तीन फायलीतले कागद व्यवस्थित जुळवून मी त्यांना फीती बांधतो आणि साहेबांच्या खोलींत जाऊन उभा राहतो.

हातांतले कागद वाचण्यांत गढून गेलेले साहेब मान वर करून पाहतात आणि म्हणतात, "हं, बोला कुळकर्णी !"

"रजा हवीय !"

"रजा ? यावेळीं ? वर्षअखेरीला ?"

ते आणखीहि कांहीं बोलणार असतात पण मी त्यांच्यासमोर तारेचा लिफाफा उघडतो. तारेवर नजर टाकतांच त्यांचा चेहरा बदलतो आणि ते म्हणतात. "सॉरी, मि. कुळकर्णी. रजेबद्दल विचारण्यापूर्वी हें कां सांगितलं नाहींत ? छे, छे, तुम्हांला गेलंच पाहिजे. पण मघांशीच तुम्हीं म्हणाला होता . . .

अगदीं अचानक मुलाची तब्येत बिघडलेली दिसते. डोंट वरी. सारं कांहीं ठीक होईल."

मी कांहीं न बोलतां बाहेर पडतो आणि घड्याळाकडं पाहतो. दोन वाजायला आलेले असतात. आतां अंगावरच्या कपड्यानिशी गेलं पाहिजे. बोरीवलीला घरीं जाऊन, बॅगेंत कपडे भरून, दादरला परत येऊन गाडी पकडणं कसं शक्य आहे ? मी लिफ्टनं खालीं येतो. मला रस्ता ओलांडायचा असतो. उजव्या बाजूनं भरधाव येणाऱ्या मोटारकडं पाहूनहि डाव्या बाजूनं येणाऱ्या मोटारला चुकवीत रस्ता ओलांडण्याचा मी प्रयत्न करतो. कचकन् ब्रेक दाबून उजव्या बाजूनं येणारी मोटार थांबवली जाते अगदीं माझ्या पावलाजवळ ! आणि ड्रायव्हर संतापून म्हणतो, "साहेब, मरायचंय् काय ? थोडक्यांत वांचलांत नाहींतर जात होतात." मी नुसता हंसलो. मी एक टॅक्सी थांबवतो. टॅक्सीत चढून दरवाजा लावून घेतो तेव्हां समोरच्या हॉटेलमधून लंच घेऊन मैत्रीणींच्या घोळक्यांत बाहेर पडत असलेली शुभा कर्णिक मला दिसते. माझ्याकडे पाहून ती हात उंचावते आणि गोड हंसते. गेल्या वर्षी माझ्याबरोबर नाटकांत काम केल्यापासून चांगली दोस्ती झाली आहे आमची. नाकीडोळी रेखीव असलेली ही फटाकडी पोरगी असं जीवघेणें हंसते आणि अशा तोऱ्यांत चालते ! नाटकांतला तिचा माझ्याबरोबरचा मोकळा अभिनय पाहून सुमतीनंहि नंतर अशी खोदूनखोदून चौकशी केली होती. बोरीबंदर येईपर्यंत मग मला शुभा कर्णिकच्या चालण्याचा दिमाखच दिसत राहतो.

तिकीट काढून मी प्लॅटफॉर्मवर येतो, तेव्हां गाडी उभीच असते. डब्याच्या दरवाजाशीं देखील माणसांची एवढी खेंचाखेंच झालेली असते कीं, अनेक भाषांतील भांडणें, खटके ऐकत, पाहत आणि पोंचवायला आलेल्या भय्यांच्या जमावांतून वाट काढीत मी एका टोंकापासून दुसऱ्या टोंकापर्यंत नुसता चक्कर मारून येतो व परत फिरतो. तिसऱ्या वर्गाच्या राखीव डब्यापाशीं मी थोडासा रेंगाळतो एवढ्यांत कुणीतरी किनऱ्या स्वरांत हांक मारतं, "कुळकर्णी ! अहो कुळकर्णी" आठवतं आवाज पुरुषाचा असला तरी बाईच्या आवाजाशीं सलगी करणारा आणि म्हणून हजारोंतून ओळखू येणारा ! हा नाडकर्णी असणार. मी खिडकींतून डोकावणाऱ्या माणसाकडे पाहूं लागतो तेव्हां नाडकर्णी तोंड भरून हंसतो आणि विचारतो, "काय जागा मिळाली नाहीं वाटतं ?" मी मान हलवतो तेव्हां तो म्हणतो, "या ! इथं जागा आहे एक." मी नाडकर्णी बसला होता तिथं जातो तेव्हां त्याच्या शेजारीं बसलेली एक बिनबाह्यांची, ओठ रंगवलेली. आंखूड केसांची ठेंगणी नकटी पोरगी जरा बाजूला सरकून मला जागा करून देते. म्हणजे शेजार फारसा चांगला नाहीं. तरी समोर मात्र दृष्टिसुख भरपूर आहे. समोरच्या बांकावर खिडकीपाशीं एक गुबगुबीत बाई आहे. बोलक्या डोळ्यांची, लांबसडक दाट केसांची, गव्हाळ वर्णाची. नाडकर्णी विचारतो, "अरे, काय आजारी बिजारी होता काय ? उतरला आहांत. मध्यें कसे अगदीं भरला होतात." मी कांहींच बोलत नाहीं.

"सामान कुठं आहे ?"

"बरोबर कांहीं घेण्याला वेळ नाहीं मिळाला. तसंच जरुरीचं काम निघालं."

"कुठं चाललांत ?"

"नाशिकला."

"नाशिकला ? कां ?"

"सासुरवाडी आहे तिथं."

"वा ! मग काय बोलायलाच नको." नाडकर्णी हंसतो, आणि म्हणतो, "कुळकर्णी, तुमची ओळख करून द्यायची राहिलीच या सर्व मंडळींशीं."

त्याच्याबरोबर आहेत त्याचे पांच दोस्त आणि त्या दोन बाया. माझ्या शेजारचं औषध आहे स्टेनो. मिस् लोबो. समोरची भरलेली बाई आहे सौ. सुखात्मे. नाडकर्णी आणि मंडळी अजिंठा वेरूळच्या सहलीसाठीं निघाली आहेत. सगळे एकाच फर्ममध्यें काम करतात. नाडकर्णी त्यांना सांगतो आहे, "हे माझे जुने सहकारी, कुळकर्णी, मी आपल्या फर्ममध्यें येण्यापूर्वी सचिवालयांत होतो ना ! तिथली ओळख आमची. कुळकर्णी फार चांगले नट आहेत बरं कां आणि अतिशय विनोदी—म्हणजे काय आहे—हे कुणाची नक्कल हुबेहूब करून दाखवतात—कंपनीला माणूस फार उत्तम . . ."

"अरे वा, वा ! म्हणजे आज अगदीं चांगला योग आहे म्हणायचा" नाडकर्णीचा एक मित्र म्हणतो. माझं लक्ष समोर आहे. समोरच्या बाईच्या डोळ्यात कुतूहल स्वच्छ दिसतं आहे.

"मग नकलांच्या कार्यक्रमाला नाडकर्णीच्या नकलेपासूनच सुरुवात होऊं दे." समोरून फर्माईश होते. सगळेजण गिल्ला करून दुजोरा देतात. बिचारा नाडकर्णी पडेल चेहऱ्यानं पुटपुटतो. "माझी नक्कल








काय कुणीहि करील! त्यांत काय विशेष?" समोरच्या सुखात्मेबाईला उद्देशून मी बोलूं लागतो. आणि नाडकर्णी राजसंन्यासमध्यें संभाजी झाला तर शेवटच्या प्रवेशातलं स्वगत कसं म्हणेल हें त्याच्यासारखा आवाज काढून, त्याच्यासारखे हावभाव करून मी दाखवतो. मंडळी बेहद्द खूष आहेत. सुखात्मे बाई मोळेपणानं हंसत आहेत.

गाडीनं केव्हांच बोरींबंदर सोडलं आहे आणि वेगानं धांवते आहे ती.

नाडकर्णीच्या नकलेनंतर नाडकर्णीला जरा बरं वाटावं म्हणून त्याला छळणाऱ्या आमच्या एका जुन्या साहेबाची नक्कल करतो. नाडकर्णी पोट धरधरून हंसतो आहे. त्यानंतर माझ्या पूर्वी ऐकलेल्या नकलांची तो फर्माईश करीत राहतो. आणि किल्ली दिली कीं, ध्वनिमुद्रिका वाजावी तशा मी नकला करूं लागतो स्थानिक पुढाऱ्यांच्या, नटनटयांच्या, वरिष्ठ अधिकाऱ्यांच्या! मला नशा चढूं लागते. सुखात्मे बाई भलतीच खूष झाली आहे. ते तिच्या डोळ्यांतच दिसतं आहे. मी अखंड बोलतो आहे. अधुनमधून कुणींतरी एखाद दुसरा शब्द उच्चारतं. तोहि स्तुतीचा, खुषीचा!

इगतपुरीच्या स्टेशनांत सुस्कारे सोडीत गाडी शिरूं लागते तेव्हां नाडकर्णी म्हणतो, "बटाटे वडे हवे आहेत ना रे?" "वा! हा काय प्रश्न झाला?" त्याचे मित्र दुजोरा देतात. गाडी थांबते तशी सगळी मंडळी उतरतात. उतरतां उतरतां दोघे-तिघे म्हणतात, "कुळकर्णी, मजा आली बुवा. हंसून हंसून पोट दुखलं सालं! इगतपुरी कधीं आलं कळलंहि नाहीं. वा! भरपूर स्टॉक आहे बुवा तुमच्याजवळ." मी खालीं उतरत नाहीं. माझ्या शेजारची ती नकटी स्टेनो मात्र खालीं उतरते. तिच्या शेजारीं मघाशीं बसलेला तो चष्मेवाला पोरगा तिच्यावर लट्टू दिसतोय! ती दोघें हातांत हात गुंफून डब्याच्या दरवाजासमोरच थोड्याशा अंतरावर उभी राहतात. सुखात्मेबाई पर्स चांचपूं लागतात. मला म्हणतात, "कुळकर्णी, आज किती हंसले हो मी! तुम्हीं एवढे हंसवाल असं नव्हतं वाटलं. बरं झालं. या निमित्तानं तुमची ओळख झाली." पर्समधून ती कॅडबरी चॉकलेट काढते आणि तिरप्या नजरेनं माझ्याकडे पाहून म्हणते, "हे घ्या. तुम्हांला आवडतं ना? मला बाई फार आवडतं." कॅडबरीची चव माझ्या जिभेवर रेंगाळू लागते. मी म्हणतो, "हे खाणं फार वाईट बघा. एक दोन वड्या पुऱ्या होत नाहीत. त्यानं तोंड खवळतं." सुखात्मे बाई हंसते आणि आणखी तीन चार वड्या माझ्या हातीं देते. बाई वरच्या बर्थवरच्या हँडबॅगेंत हात घालून कांहींतरी चांचपीत क्षणभर उभी राहते आणि मग खिडकीशेजारच्या आपल्या जागीं बसायच्या ऐवजीं चक्क माझ्या शेजारी बसते आणि म्हणते, "स्टॉक संपला..........माझ्या मुलाला चॉकलेटं फार आवडतात बघा. एक दोन वड्या त्याच्या हातावर ठेवल्या तर त्याचं समाधान होत नाहीं. सारखा हट्ट धरून बसतो. हे म्हणतात, तूं संवय लावली आहेस त्याला....!" कॅड-







अनुक्रमणिका

वरी आहे कां हे पाहण्याचं निमित्त करून बाईनीं जागा बदलली कीं ! मी खिडकी-जवळची नाडकर्णींची मोकळी जागा पटकावतो. एवढ्यांत वटाटे वडे घेऊन आंत आलेल्या मंडळींना पाहून माझ्या-जवळ सरकून ती साळसूदपणें त्यांना जागा करून देते. बाई मोठी बिलंदर दिसते !

पत्त्यांचा डाव मांडला जातो. झब्बूचा ! माझ्या हातांतली पानें सुखात्मे बाई सरळ पाहते. आपली पानें मात्र दाखवीत नाहीं. खेळतां खेळतां बाईच्या खांद्याला स्पर्श होतो. लांबसडक बोटांचा स्पर्श होतो. बाईनीं माळलेला मोगरा दरवळत असतो. माझं मन ठिकाणावर नाहीं. दिलेला झब्बू, कुणीं घेतलेला झब्बू लक्षांत राहात नाहीं. मी पुन्हां पुन्हां गाढव होतो आणि पत्ते पिसत राहतो.

देवळालीला गाडी थांबते तेव्हां डाव थांबवून सुखात्मे बाई म्हणतात, "आतां पुढचं स्टेशन नाशिक ना ? मी म्हणतो, "हं, आतां येईलच एक दहा मिनिटांत." नाडकर्णी आणि मंडळी पुन्हां पुन्हां माझ्या-मुळं वेळ चांगला गेला म्हणतात. नाशिक-रोड दिसू लागतं तेव्हां काळोख पसरू लागलेला असतो. मिणमिणते दिवे लुक-लुकत असतात. मी उठतो आणि सर्वांना नमस्कार करतो. सुखात्मे बाई म्हणतात, "वरंय, ओळख ठेवा. तुम्हीं सासुरवाडीला निघाला आहांत म्हणून ! नाहींतर मी नाडकर्णींना म्हणणार होते चला तुम्हांला बरोबर घेऊन अजिंठ्यापर्यंत. मुंबईला या हं एकदां आमच्याकडं."

डब्याच्या दरवाजापाशीं उभा राहून मी प्लॅटफॉर्मवरच्या गर्दीत सुमतीच्या कडचं कुणीं आलं आहे कां तें पाहूं लागतो. स्टॉलपाशीं उभे असलेले सासरे मला दिसतात. गाडी थांबल्यावर गर्दीत घुसण्या-पूर्वी मी डब्याकडे पाहतो. खिडकीशीं सुखात्मे बाई दिसते. माझ्याकडेच पाहते आहे. भोंवतालच्या माणसांच्या गर्दीमुळें क्षणभर सासरे दिसेनासे होतात. आणि मग एकदम ते माझ्याजवळ येतात. त्यांचा चेहरा उदास आहे. धोतरांच्या सोग्यानं ते आपल्या चष्म्याच्या कांचा पुसूं लाग-तात. भरलेल्या आवाजानं नुसतं म्हणतात, "राजाभाऊ. . ." मी विचारतो, "संजय कसा आहे ?"

"पहांटेच गेला पोर ! राजाभाऊ. देव तरी आम्हां म्हाताऱ्यांना कां एवढं आयुष्य देतो हो ! सोन्यासारखं पोर असं तडको-फडकीं. . . . . . . . . . ."

सासऱ्यांना पुढें बोलवत नाहीं. ते माझा हात घट्ट धरतात. आम्हीं थोडा वेळ तसेच उभे राहतो. स्टेशनच्या बाहेर येतो. एवढ्यांत खालीं मान घालून मेहुणा येतो. म्हणतो, "टॅक्सी ठरवली आहे."

मी टॅक्सींत बसल्यावर विचारतो, "काय झालं एकाएकीं संजयला ?"

"कांहीं कळलं नाहीं. संध्याकाळपर्यंत खेळत होता चांगला. संध्याकाळीं खूप रडला. सगळीजणं घाबरलो. डॉक्टरना घेऊन आलो. तब्येत विघडतच गेली. सर्व उपाय करून पाहिले. पण पहांटे—" मेहुणा खिन्नपणानं सांगतो.

"पोर डोळ्यासमोरून हलत नाहीं बघा, राजाभाऊ ! काल संध्याकाळीं घर-भर फिरत होता आणि आज ? घर खायला उठलं आहे. त्याच्या जन्मापासून तो आमच्याकडं आहे. सर्वांना संवय झाली होती. आतां घर कसं सुनं सुनं वाटतं आहे. राजाभाऊ, तुम्हीं त्याला एकदां तरी पहायला पाहिजे होतं हो. पण आम्हींच तुम्हांला सांगून ठेवलं होतं. निदान सहा महिने तरी बापानं मुलाचा चेहरा पहा-यचा नाहीं. कसलं काय अन् कसलं काय ? प्राक्तनांत लिहिलं आहे ते काय चुकतंय ? तेवढाच त्याचा आपला ऋणानुबंध होता म्हणायचं आणि स्वस्थ बसायचं. पण राजाभाऊ, मनाला सारखी रुखरुख लागली आहे कीं, ज्योतिषाच्या नादीं लागून आम्हीं तुम्हांला त्याला एकदां-देखील बघू दिलं नाहीं." सासरे भरलेल्या आवाजांत बोलतात.

"त्याला काय करणार ? माझी मुलं जगत नाहींत म्हणून जे जे उपाय तुम्हांला कुणीं करायला सांगितले ते तुम्हीं केले. नातवंडाच्या आयुष्याची दोरी बळकट व्हावी, म्हणूनच तुम्हीं केलं सारं. हे सारे उपाय करणं तुम्हांला किती जड गेलं असेल !"

"होय राजाभाऊ. एवढ्या थाटांत बारसं केलं. किती मंडळी जमली होती. तुम्हीं मात्र नव्हता. पत्रिका पाहणाऱ्यानं बजावून सांगितलं होतं कीं, पहिले सहा महिने बापलेकाची दृष्टभेटहि होतां कामा नये. म्हटलं थोडीशी कळ काढावी. अखेर सारं ठीक होईल. पण परमेश्वराच्या मनांत कांहीं निराळंच होतं. राजा- भाऊ, देवाचं कांहीं करायचं राहून गेलं आहे कां तुमच्या घरांत ! कुळाचार, कुळधर्म कांहीं राहिलं कां ?"



**कुठें शिकलीस असे—**

कुठें शिकलीस असे
  नटमोगरीचे ढंग
शपथेच्या शब्दांनाहि
  द्यावा उडणारा रंग

अवचित झाली भेट—
  डाव असा घडवावा
नकाराच्या कडेवर
  मीना खोटा जडवावा

असावध असतांना
  घाव घालावा अचूक
वरपांगी आंसवांचें
  ओलें योजावें कौतुक

निरोपाच्या उत्सवाचें
  नाट्य सजवावें क्रूर
पश्चात्तापाचा उगीच
  त्यांत मिसळावा सूर—

आणि होतां मी घायाळ
  तुझें कसब नेणून
असें फुलावें-उलावें
  सुखावून-दुखावून !

—कु. व. निकुम्ब








"नसावेत. आई गेली तेव्हां सुमतीला सगळं सांगून गेली होती. तिनं जसं सांगितलं होतं तसं आम्हीं करीत आलो."

"ते बाकी खरंच ! तुमच्या मातोश्री असतांनाच सुमाच्या दोन खेपा झाल्या होत्या नाहीं का ? मुलं जगत नाहींत हें पाहून सुचतील ते उपाय त्यांनीं केले असतीलच. नातवंड खेळवावंसं कुणाला वाटत नाहीं ?"

"खरं म्हणजे पहिल्या खेपेला मूल जन्मताच गेलेलं होतं असं तुम्हीं कळवलं तेव्हांच कुणींतरी म्हणालं होतं, "कांहीं कुळधर्म राहिला असेल तर बघा." आई तेव्हां म्हणाली कीं, तिला माहीत असलेले सारे कुळधर्म व्यवस्थित होतात. त्यांतूनहि कांहीं रहायला नको म्हणून नंतर मुद्दाम आम्हीं उभयतां कोल्हापूरला देवीच्या दर्शनाला जाऊन आलो होतो."

"हो सुमानं लिहिलं होतं तेव्हां तुम्हीं देवीची पूजा केली आणि खणानारळानं ओटी भरली होती. जगदंबेच्या मनांत काय आहे कोण जाणे ! पण राजाभाऊ, घडलं आहे ते सारं असं अकल्पित कीं कांहीं सुचत नाहीं. असं कां व्हावं ? समजत नाहीं. सुमा संजय गेला म्हणताच बेशुद्ध झाली हो ? नंतर असा टाहो फोडलान् ! काळजाचं पाणी पाणी झालं. तेव्हांपासून सारखी रडते आहे. एकवेळ पोरवाळ नाहीं झालं तर माणूस गप्प बसेल पण झालेलीं पोरं अशी डोळ्यांदेखत बघतां बघतां ध्यानीमनी नसतां जावी ! परमेश्वर तरी कां अशी कसोटी पाहतो कुणास ठाऊक ?"

मी कांहींच बोलत नाहीं. एवढा वेळ खिन्न चेहरा करून स्तब्ध बसलेला मेहुणा म्हणतो, "अक्कानं विलक्षण हाय खाल्लीय ! तिची समजूत तरी कोण आणि कशी घालणार ?"

टॅक्सी आतां नाशकांतल्या अरुंद रस्त्यावरून जाते आहे. वाहनांची गर्दी, माणसांची गर्दी, रेडिओवरल्या गीतांचे स्वर, फिरायला निघालेली जोडपीं आणि दुकानांत खरेदी करणारी कुटुंबवत्सल माणसं. टॅक्सी मोठा चौक ओलांडून आतां —— चिंचोळ्या गल्लींत शिरते आणि थांबते.

वाड्याच्या दिंडी दरवाजापाशीच मेहुण्याची मुलगी उभी आहे. ती मला बाजूला सरकून वाट देते. मी जिना चढतो आणि वरच्या खोलींत शिरतो. मला पाहतांच सुमती मुसमुसून रडूं लागते. तिच्याजवळ बसलेली तिची वहिनी मला पाहून कांहीं न बोलतां डोळ्यांना पदर लावीत बाहेर पडते. आतां खोलींत फक्त आम्हीं दोघेंच आहोंत मी आणि सुमती. बाळंतपणातून उठल्यानंतर सुमती चांगली भरलेली दिसते. चेहरा मात्र सुकलेला आहे. गुडघ्यांत मान घालून ओक्साबोक्सी रडणाऱ्या सुमतीच्या पाठीवर मी हात फिरवतो हलकेंच. ती एकदम मला बिलगते आणि खांद्यावर डोकें ठेवून असहाय्यपणें रडूं लागते. हुंदके देत म्हणते, "आपला संजय गेला हो. कां देव अशी परीक्षा पाहतोय हो आपली ? हंसतं खेळतं मूल, झाला तेव्हां साडेआठ पौंडाचा होता. केवढा दिसायचा अलिकडे ! कांहीं किरकिर नाहीं. औषधपाणी करावं लागलं नाहीं. आणि काल एकाएकीं . . ."

मी सुमतीच्या केसांतून हलकेंच बोटें फिरवतो.

"आपला दुसरा मुलगा होता ना ? अगदीं त्याच्यासारखाच दिसायचा. गुलाम हंसायचा तो थेट तुमच्यासारखा. तो तसा गेला. अकस्मात तीन महिन्यांचा होऊन ! हा असा ! पूर्वजन्मीं मी असं कोणतं पाप केलं आहे म्हणून देव मला अशी शिक्षा देतो आहे हो ?"

मी स्तब्ध बसतो. दुःखाचा हा आवेग मीहि मागें अनुभवला आहे. बायका मोकळेपणानं रडू तरी शकतात. पण पुरुषाला आंतल्याआंत जळत रहावं लागतं. आपल्या डोळ्यांत गर्दी करणारी आंसवं आवरावी लागतात. पहिल्या खेपेला झालेला मुलगा जन्मताच गेला असं कळलं तेव्हां वाईट वाटलं होतं. थोड्या दिवसांनीं सहज विसरूं शकतो तें दुःख ! दुसऱ्या मुलाच्या वेळीं मात्र फार कठीण गेलं. दिवस अन् दिवस बेचैन रहात असे. कशांत कांहीं मन रमत नव्हतं. सारखा गेलेला मुलगा डोळ्यांसमोर उभा रहायचा. कशांत तरी लक्ष गुंतवायचं म्हणून वाचूं लागलो. वाचून वाचून डोळे दुखूं लागले कीं, दिवा न लावतां अंधारातच आरामखुर्चीवर पडून राहूं लागलो. थोडासा हवा पालट आणि दुःख कमी व्हावं म्हणून सासरे सुमतीला नाशिकला घेऊन गेले होते. एका रात्रीं असाच बसलो होतो. तेव्हां आई आली आणि म्हणाली, "राजा, तुला काय होतं आहे रे ? कांहीं खातपीत नाहींस. वाळला आहेस अलिकडे."

"कांहीं नाहीं ग. मुलगा गेल्यापासून लक्षच लागत नाहीं."

"काय करायचं बाबा ? या जन्मीचे भोग भोगले पाहिजेत. राजा, तूं एवढं मनाला लावून घेतलंयस ! मग मी कसं सहन करायचं रे ?" आईच्या डोळ्यांतून पाणी ओघळूं लागलं.

"तुला आजपर्यंत कधीं सांगितलं नाहीं. पण कधींतरी तुला सांगायला हवं ! राजा. आपल्या घराण्याला शाप आहे म्हणतात. या घरांत मूल जन्माला आलं कीं, ते तरी जगतं नाहीं तर मुलाचा बाप तरी !

"आई. काय सांगते आहेस तूं हे ?"

"राजा, तुझा विश्वास बसायचा नाही असल्या गोष्टींवर ! तुझे वडील तूं वर्षाचा व्हायच्या आंतच गेले. तूं लहान होतास. तुला पोटाशीं धरून मी रडत बसायची. कर्तासवरता एकुलता एक मुलगा गेल्याचं दुःख गिळून तुझ्याकडे पाहून सासूबाईनीं खंबीरपणं प्रपंच चालवायला सुरुवात केली होती. एक दिवस माझी समजूत घालतां घालतां त्यांना राहवलं नाहीं. त्यांनीं सांगितलं मला हे. आजेसासूबाईंनीं सांगितलं होतं म्हणे त्यांना हे. हे तीन चार महिन्याचे असतांना तुझे आजोबा साप चाऊन गेले.

मी सुन्न झालो होतो हें ऐकून. मला आठवलं तेव्हां ! सुमतीला दिवस गेले कीं, आई किती काळजी करायची ते. दिवस भरत येऊं लागले कीं, आईचं चित्त ठिकाणावर नसायचं. एखाद्या दिवशीं मला यायला उशीर झाला कीं, एवढी रागवायची ती ! लहानपणीं शाळेंतून यायला उशीर झाला कीं, जशी रागवायची तशी ! म्हणायची, "कुठं भटकतोस रे एवढा वेळ? दिवेलागणीला सगळे घरीं येतात. याचा आपला पत्ता नाहीं. या मुंबईंत शोधायला तरी माणूस पाठवितां येण्यासारखं आहे कां ? मोटारी आहेत, आगगाड्या आहेत ! तुम्हीं घरीं येईपर्यंत आमचा जीव आपला टांगणीला लागलेला असतो."

आईच्या या असल्या बोलण्याचा अर्थ त्या दिवशीं मला समजला.

"कांहींतरी समजूत करून घेतां तुम्हीं जुने लोक ! कसला शाप आणि काय ?" असं त्या दिवशीं मी म्हणालो खरा आईला. पण नंतर आईचं बोलणं कधींच विसरूं शकलो नाहीं.

सुमतीला कशाला हें सांगायचं ? म्हणून कधींच सांगितलं नाहीं. आतांहि मी हे सारं तिला सांगत नाहीं. मी तिला आणखी जवळ ओढतो. तिचे डोळे पुसतो. तिला थोपटल्यासारखं करतो आणि तिचे हुंदके ऐकत राहतो. . . . . . . .हुंदके ऐकत राहतो.

● ● ●















अनुक्रमणिका



बाबा गांवाहून परतले. त्यांना कळले कीं, घरांतली स्वयंपाकीण काम सोडून गेली आहे. स्वयंपाकीण नाहीं आणि आई तर आजारी– ते तडक शोधायला निघाले. त्या 'शोधा'चीच ही 'बोध' कथा–याने 'किस्सा'

# शोध

वि. रा. भाटकर

**बाबा** एकदां कांहीं कामा-निमित्त बाहेरगांवीं गेले होते. ते परत आले तेव्हां आपल्या घरांत बरीच उलथापालथ झाली असल्याचें त्यांना दिसून आलें. आमची स्वयंपाकीण काम सोडून गेली होती. मी त्यावेळीं चार वर्षांचा होतों, जॉर्ज दोन वर्षांचा होता आणि शिवाय घरांत एक तान्हें बाळ होतें. आईला बरें नव्हतें आणि आम्हांला घरीं ठेवून नोकर मिळ-वून देणाऱ्या एखाद्या संस्थेकडे तिला जातां येणें शक्य नव्हतें आणि तिला स्वतःला स्वयंपाक चांगला करतां येत नसल्यामुळें जेवणाचा एकंदर बेत कांहीं ठीक नव्हता.

हा अनुभव बाबांना अगदीं नवीन होता. त्यांच्या वडिलांच्या ह्यातींत नोकर असे एकाएकीं बदलण्यांत येत नसत. खरें म्हणजे नोकर फार क्वचितच बदलण्यांत येत. आणि त्यांची आई स्वयंपाककलेंत निपुण असल्यामुळें त्यांना नेहमीं दुहेरी संरक्षण मिळत असे. त्यांचें लग्न झाल्या-पासून अधूनमधून त्यांना थोडा त्रास होत असे. पण हा म्हणजे अगदीं कळस होता.

बिछान्यांत निजून राहिलेल्या आईला 'याबाबत काय करण्याचा तुझा विचार आहे ?' असें त्यांनीं विचारलें. त्यावेळीं टेलिफोन नव्हते आणि तावडतोब तिला कांहीं करतां येण्यासारखें नव्हतें. 'सकाळीं एजन्सींत जाऊन कांहीं करतां आलं तर पाहीन.' असें ती म्हणाली. "सकाळीं ? अरे देवा !" बाबा म्हणाले. "ती एजन्सी कुठें आहे ?" आणि पुन्हां हॅट चढवून ते सहाव्या रस्त्याच्या दिशेनें निघाले.

पुढें काय प्रकार घडला तो मला नंतर पुष्कळ वर्षांनीं समजला तो असा.

बाबा तिथें पोहोंचले तेव्हां बराच उशीर झाला होता. ते जिन्याच्या दोन दोन, तीन तीन पायऱ्या एकदम चढून वर गेले. त्या संस्थेच्या कार्यालयांत गेले. तिथें गॅसचे दिवे जळत होते. ते अशा जागीं कधीं गेलेलें नव्हते. कार्या-लय रिकामें असलेले पाहून मात्र त्यांना आश्चर्य वाटलें. खोलींत एका बाजूला एका टेबलाशीं एक बाई गंभीर चेहरा करून बसलेली होती. "त्यांना कुठें ठेवतां तुम्हीं ?" त्यांनीं घाईनें विचारलें. त्यांचें सारे लक्ष जेवणाच्या प्रश्नाकडे लागलेलें होतें.

त्या बाईनें त्यांच्याकडे पाहिलें, आपलें पेन काढलें आणि मुद्दामच एक मोठी वही उघडली.

"तुमचं नांव आणि पत्ता मला सांगा," ती बाबांना म्हणाली. "आणि तुम्हाला








माणूस कोणत्या कामासाठीं आणि केव्हा-पासून पाहिजे तेंहि सांगा."

पण बाबांना हे असलें फालतू चाळे करीत बसायला वेळ नव्हता. आणि त्यांनीं तिला तसें स्पष्ट सांगितलें.

"त्यांना कुठें ठेवतां तुम्ही ?" त्यांनीं विचारलें. ती त्यांच्या जेवणाला उशीर करीत होती. बोलतांना त्यांचा चेहरा कसा लालबुंद झाला असेल आणि त्यांनीं तिच्याकडे डोळे वटारून कसें पाहिलें असेल त्याची मला चांगली कल्पना करतां येते.

"मी तुम्हांला विचारतोंय, तुम्ही त्यांना कुठें ठेवतां ?" ते गरजले.

"त्या मुली तिकडे आंत आहेत," त्यांना शांत करण्याकरितां ती बाई म्हणाली. "पण गिन्हाईकांना तिकडे आंत जायला परवानगी नाहीं. तुम्हांला कुठल्या कामाकरतां बाई हवी आहे तें मला सांगि-तलंत तर मी तिला इकडे घेवून येईन."

पण तिचें बोलणें पुरें होण्यापूर्वीच बाबा धाडकन् दार उघडून आंत गेले होते. आंत पुष्कळ मुली बसलेल्या होत्या. तरुण आणि वयस्क, स्थूल आणि सड-पातळ, सर्व आकारांच्या आणि मापांच्या. कांहीं कुरुप होत्या. कांहीं सुरेख, तरतरीत होत्या. दाया, मोलकरणी, घरकामासाठीं राहणाऱ्या बायका, स्वयंपाकिणी.

ती व्यवस्थापिका आतां आंत येऊन बाबांना बाहेर घालविण्याचा प्रयत्न करीत होती. त्यांना कुठल्या कामा-साठीं बाई हवी होती तें सांगण्याविषयीं तिचा आग्रह चालला होता. पण बाबा तिच्याकडे लक्षच देत नव्हते. त्या मुलीं-मधून कुठली निवडावी हें ठरविण्याकरितां ते एकीकडून दुसरीकडें नजर टाकीत होते. त्यांचे लक्ष कोंपऱ्यांत बसलेल्या एका लहानशा दिसणाऱ्या बाईकडे गेलें. तिच्या डोळ्यांत प्रामाणिकपणाची झांक दिसत होती. आपल्या जागीं ती अगदीं शांत बसली होती. बाबांनीं आपली छडी तिच्या दिशेनें दाखविली आणि ते म्हणाले, "ती बाई चालेल मला."

ती व्यवस्थापिका अगदीं गोंधळून गेली होती. पण अजून ती आपला अधिकार गाजविण्याचा प्रयत्न करीतच होती.

"पण मला हें सांगा, तुम्हांला कुठल्या कामाकरतां बाई—"

"स्वयंपाक करण्यासाठीं," बाबा म्हणाले. "स्वयंपाक करण्यासाठीं बाई हवी आहे मला."

"पण मार्गारेटला स्वयंपाकीण व्हायची इच्छा नाहीं. तिला—"

"तुला स्वयंपाक करतां येतो, येतो ना ?" बाबांनी विचारलें.

अशा एका करारी गृहस्थानें इतक्या मुलींमधून आपलीच निवड करावी या कल्पनेनें मार्गारेटचा साधाभोळा चेहरा उत्सुकतेनें आणि आनंदानें किंचित् तांबूस झाला होता. बाबा तिच्याकडे बघून हळूंच हसले सुद्धां असावेत. कारण त्या दोघांना एकमेकांविषयीं लगेच आपलेपणा निर्माण झाला होता. आपण एकदा एका घरीं स्वयपाकीण म्हणून असल्याचें तिनें सांगितलें.

"अर्थात तिला स्वयंपाक करतां येतो," बाबा म्हणाले.

त्या प्रसंगाचें वर्णन करतांना नंतर ते म्हणाले, "तिला स्वयंपाक करतां येत असला पाहिजे हें मला ताबडतोब समजलें."

त्या व्यवस्थापिकेला हा सारा प्रकार पसंत नव्हता. त्यामुळें कार्यालयाच्या शिस्ती-मध्यें बिघाड निर्माण झाला होता.

"तुम्ही तिला कामाला ठेवणारच असलांत," ती कडवटपणें म्हणाली, "तर तिनें कोणत्या दिवशीं तुमच्याकडे यायचं ते मला सांगून ठेवा. आणि तुमचं नांव कृपा करून मला सांगाल का ?"

"हो, हो, सांगतों," बाबा तें न सांग-तांच म्हणाले. "चल, मार्गारेट." आणि टेब-लावर फीची रक्कम टाकून ते चालूं लागले.

मार्गारेट त्यांच्या मागोमाग दारांतून बाहेर पडली आणि त्यांच्या बरोबरच आमच्या घरीं आली. बाबांनीं तिला ताबड-तोब स्वयंपाकघराकडे जायला सांगितलें आणि आपण कपडे बदलायला वर गेले.

"नवीन नोकर ठेवण्याच्या बाबीचा तूं इतका बाऊ कां करतेस मला समजत नाहीं. अगदीं सोपं आहे तें," त्या रात्रीं मार्गारेटनें प्रथमच केलेलें जेवण पोटभर जेवल्यानंतर आराम करतांना बाबा आईला म्हणाले.

पुढें तिनें केलेल्या अनेक जेवणांपैकीं तें पहिलें जेवण होतें. कारण ती आमच्या घरीं पुढें सव्वीस वर्षे राहिली. ●●●



**एक तात्पर्यिका—**

**एक किरमिजी संध्याकाळ**
**(वाटल्यास रंग बदलणे)**
**थोडे दहिवर थोडा गहिवर**
**(मिश्रण घेतांना हालवणे)**

**तो आणि ती असायलाच हवींत**
**(सोबतीला चंद्र...वारे...तारे)**
**आणाभाका... हुंदके... उसासे**
**(सोयीप्रमाणे येतील सारे)**

**ती दोघे सरळ बोलल्यास**
**(कविता एकदम 'खुजी' ठरेल)**
**दुर्बोध संवाद...तिरकस नसल्यास**
**(नवतावाद्यांचा बाप मरेल)**

**तूं किती किती छान दिसतेस !"**
**(हे आपले नेहमीचेच बाळबोध)**
**'मनाच्या आरशावर तडा..तुझ्या रूपाचा'**
**(हे 'खोलीवाल्यांचे' तिरकस शोध)**

**हे टिकाकार मात्र 'थोरच'...**
**(कशाला करीत असतात पोपटपंची?)**
**चांगली 'भाषांतरे' करायची सोडून**
**(मोजीत बसतात...खोली...उंची !)**

**मतामतांचा हा प्रचंड गलबला...**
**(प्रेम...आणि माणूस मात्र तेच सनातन)**
**तात्पर्यः—जमेल तसे त्यानें लिहावे**
**(कोठल्याही पंथाला विकू नये मन)**

**—सदाशिव करंदीकर**





अनुक्रमणिका




**सह्याद्रीची चोरी • सिनिकथा**

## व्यक्तींपेक्षां प्रवृत्तींवर प्रहार करणारा विनोद

**विपुल** लिहूनही पुन्हां सकस व वैशिष्टयपूर्ण असें विनोदी लेखन करणाऱ्या आजच्या विनोदी लेखकांत श्री. रमेश मंत्री यांचा समावेश आवर्जून करावा लागेल. 'विनोदी' ही लेखनाची एक वेगळीच जात असली तरी त्यांतहि आपण 'वर्णाश्रमी' असल्यानें शाखा-पोटशाखा आहेत. 'पु लं' ची जात वेगळी, जयवंत दळवींची 'जात' त्याहून वेगळी. बुवांचा सारा संसारच वेगळा असा प्रकार आपल्याला आढळून येतो. त्यामळें, 'पु. लं'चा विनोद डोक्यावर घेऊन नाचणारीं माणसें 'बुवां'ना नाकें मुरडतांना दिसतात. तर शामराव ओक, कॅप्टन लिमये वगैरेचें भक्त (वा भगत–सोयीनें समजून घ्यावें) 'पु. लं'चा विनोद "क्लासिकल" (म्ह. विशिष्ट वर्गापुरताच ) आहे असें सुचवितांना दिसतात. रमेश मंत्री यांचा विनोद हा याहून वेगळा आहे. त्यामध्यें 'व्यक्ती'तल्या 'वल्लीं'-पेक्षां 'व्यक्ती'तल्या 'प्रकृती'वर भर अधिक असल्याचें जाणवतें. आणि माणसांची नांवे (वा गांवेही) बदलली तरी माणसांची 'प्रकृति' सहसा बदलत नाहीं. त्यांतल्या बारीकसारीक छटा 'टिकून' राहतात. त्या छटा हाच मुळीं मंत्र्यांच्या विनोदाचा सनातन विषय असतो. त्यामुळेंच मंत्री यांच्या विनोदाला एक प्रकारचा ताजेपणा (Freshness) असल्याचें जाणवते.

**'सह्याद्रीची चोरी'** ह्या त्यांच्या विनोदी लेखसंग्रहांत त्यांच्या अतिशय ताज्या (Latest) अशा तेरा विनोदी लेखांचा समावेश करण्यांत आला आहे. मी वर म्हटल्याप्रमाणें मंत्री यांचे लक्ष 'प्रकृती' (व प्रवृत्ती) वर असल्याचा प्रत्यय ह्या संग्रहांतील जवळ जवळ सर्वच लेखांतून येईल. विशेषत: शासन यंत्रणेंत कांहीं एका यांत्रिक पद्धतीमळें येणारा गलथानपणा, कृत्रिमता, टोलवाटोलवीची वृत्ती, 'लाल फिती'ची पद्धत (रेड-टेपीझम्) सर्वसामान्यपणें दायित्व नाकारण्याची प्रवृत्ति इत्यादि अनेकविध दोषांवर बोट ठेवणारे प्रस्तुत संग्रहांतील **सह्याद्रीची चोरी, सचिवालयांत हत्ती, नामदेवाचा अणुबाँब, स्वर्गांत धान्य टंचाई** हे लेख मुळांतच वाचनीय आहेत. हे लेख लिहितांना सूक्ष्म व मार्मिक अवलोकनाचा जसा उपयोग मंत्री यांनीं केला आहे, तसाच उपरोधाचें शस्त्राचाही केला आहे. **सह्याद्रीची चोरी** हा लेख तर 'पोलिस' चौकशीच्या पद्धतींतल्या सर्वच गुणदोषांवर प्रकाश टाकतो. अपुऱ्या पायावर चौकशा कशा सुरूं होतात आणि शेवटीं त्यांतून पोरकट निष्कर्ष कसे निघूं शकतात ह्याचें खुमासदार चित्रण ह्या लेखांत आढळून येते. **'सचिवालयांत हत्ती'** ह्या लेखांतही सरकारी यंत्रणेंतले नेमके दोष मार्मिकपणें सुचविले आहेत. कुठल्याही घटनेचें गांभीर्य वा महत्त्व जाणून न घेतां थंडपणें नुसते 'कागद' कसे (सोयीनुसार) हलतात ह्याचे मनोज्ञ चित्रण यांत आहे. **'नामदेवाचा अणुबाँब'** ह्यांत आमच्या एकूण समाजमानसाचा व शासनाचा असा दुहेरी आविष्कार झालेला दिसतो. नव्या उमेदीने उभ्या राहणाऱ्या कल्पक व संशोधक माणसांच्या कर्तबगारीला नाऊमेद करणारी माणसें भोंवती फार आहेत. शासनांत तर त्यांची कुचंबणाच होते (म्हणून ते आत्महत्त्या करून घेतात). ह्या लेखांतल्या नामदेवानें अॅटमबाँब शोधून काढला. तो दिल्लीस नेला. पण 'रेड टेप' आडवी आली. शेवटीं त्याला मोठ्या मुश्किलीनें एका 'हेडक्लार्क'ची भेट झाली ! हा ; **अणुबाँब सरकारनें घ्यावा व माझ्या संशोधनाचं चीज होईल अशी प्रयोगशाळा मला द्यावी** एवढी साधी मागणी त्यानें केली. पण 'कांहीं न करण्याच्या' योजना दीडशें शास्त्रज्ञ व आठशें कर्मचाऱ्यांनीं रात्रंदिवस बसून ठरविली असल्यानें त्याला परतावे लागते. शेवटीं एक पिवळा लिफाफा येतो व अॅटमिक एनर्जीमध्यें ११५ ते २१० च्या ग्रेडमध्यें कारकुनाची जागा मिळावी म्हणून त्याचें नांव नोंदविल्याचें व पांच वर्षे जागा होणार नसल्याचे कळविण्यांत येते. जागेची वयोमर्यादा २१ असते. तो त्यावेळीं २४॥ वर्षांचा झालेला असतो. चाळींत, हॉटेलांत प्रवासांत समाजमानसाचे मजेशीर नमुने मंत्री यांनीं 'पेश' केले आहेत.

**लेखकांची वसाहत; ज्ञानेश्वरीचे प्रकाशन हपापाचा माल गपापा**, ह्या तीन लेखांचे प्रेरणाविषय लेखक, प्रकाशक व टीकाकार हे आहेत. लेखकांच्या वसाहतीची कल्पना हृद्य असली (व त्या वसाहती सध्यां मुंबईत होऊं घातलेल्या असल्या) तरी त्यांतून निर्माण होणाऱ्या 'गंमती' मंत्र्यांनीं फार मिश्किलपणें व मोकळेपणानें मांडल्या आहेत. लेखकही अखेर माणसेंच असतात आणि माणसांच्या स्वभावांतले सारे गुणदोष त्यांच्यांतही असतात हें ह्या लेखांत मोठ्या मार्मिकतेनें दाखविले आहे. लेखक-पत्नींचाही उपयोग चांगला केला आहे. **"लेखकांच्या साहित्याशीं अतिशय निगडित असलेल्या रद्दीवाल्यांनीहि या वसाहतींत घरांसाठीं अर्ज केले होते, पण ते फेटाळले गेले. मात्र त्यांना रद्दीसाठीं या वसाहतींत गोडाऊन्स बांधण्याची सवलत देण्यांत आली"** गडकरी



अनुक्रमणिका

हे नाटककारच नव्हते आणि हरिभाऊ आपटे हे फालतू लेखक होते अशी परखड टीका करणारे हे साहित्यिक मेळे तपासण्याच्या समितीवर वर्णी लागावी... या व यासारख्या एकेका वाक्यांत फार 'मोठा' आशय मंत्री व्यक्त करून जातात. **"हपापाचा माल गप्पापा"** ह्यांत 'नार्ती' लक्षांत घेऊन नाटच-चित्रपट परीक्षणें कशीं लिहिली–लिहवली जातात ह्याच्या 'वर्मा' वर बोट ठेवलें आहे. तर प्रकाशन धंद्यांतल्या कांहीं खास गंमती **ज्ञानेश्वरीचे प्रकाशन** ह्या लेखांत बरेचसे 'टोलेबाजी'चें काम करून जातात. ह्या साऱ्या लेखांतून मंत्र्यांच्या लेखणीचा एक विशेष मला जाणवतो तो असा–त्यांना थोड्या व मार्मिक शब्दांत फार मोठा आशय व्यक्त करतां येतो. यासाठीं सूक्ष्म अवलोकनाची गरज असते. अचूक शब्दयोजनेचे प्रभुत्व लागतें. मंत्र्यांच्या लेखांची सुरुवातसुद्धां फार चपखल, मार्मिक व उत्कंठा वाढविणारी असते हें ह्या पुस्तकांतील अनेक लेखांतून जाणवते. **'माझी सदाचार मोहीम'** ह्या लेखांत दिखाऊ घोषणाबाजांच्या समाजसेवेची खिल्ली करण्यांत आली आहे. तर **'संसाराचा सर्व्हे'**मध्यें सरकारी व अन्य सामाजिक सर्व्हे पद्धतींतल्या 'वर्मां'वर, त्यांतल्या बोगसगिरीवर बोट ठेवण्यांत आलें आहे. तें ठेवतांना स्त्रियांच्या मानसशास्त्राचा फार गंमतीदार उपयोग केला आहे. क्षणाक्षणाला पोट धरून हंसवील असा हा लेख आहे. **'लाखाचे बारा हजार'** मध्येंही 'बाया' मध्यें पडल्या व न कळत्या विषयांतही 'बायकी' लुडबुड करायला लागल्या, कीं कशी गंमत येते याचें चित्रण आढळते. **मेतकुट कसें जमते?** व **तुम्हीं मांजर व्हा** हे दोन लेख दोन मानवी प्रवृत्तींचे दिग्दर्शन करून जातात.

मंत्री ह्यांच्या विनोदांत सूडबुद्धि नाहीं. त्यांत उपरोध असलाच तरी तो प्रवृत्तींवर प्रहार करणारा आहे. आणि त्या उपरोध विषय झालेल्या प्रवृत्ती ह्या अखेर समाजविघातक असल्यानें मंत्र्यांची लेखणी पर्यायानें एक उपकारकच कार्य करून जाते. दिलखुलास खदखदून हंसविणारा व हंसत हंसत चिमटे काढणारा, जागृत करणारा! 'स्वाभाविक' गुणदोषांचे अचुक निर्देशन करणारा रमेश मंत्री यांचा विनोद ह्या पुस्तकांत वाचायला मिळतो. हें वाचन आगळेंच समाधान देते. पुस्तकाचा एक लक्षणीय विशेष म्हणजे वसंत सरवटे ह्यांचें मुखपृष्ठ व लेखांमधील रेखाचित्रें. कांहीं ठिकाणीं ती 'स्पष्ट' व 'बोचरी' झालीं आहेत. पण त्यामुळें वाचनाला रंगतही आली आहे. ज्यांच्या 'ते ते' संदर्भ लक्षांत येतील त्यांना तर तीं तीं चित्रें खुलवतील. चित्रांनीं लेखांची 'लज्जत' खूप वाढली आहे हें खास!!

**–प्रभाकर अत्रे**

[**सह्याद्रीची चोरी**–रमेश मंत्री. प्रकाशक–केशव वि. कोठावळे, मॅजेस्टिक बुक स्टॉल. पृष्ठें २२८. मूल्य–साडे आठ रुपये]

## निवेदकच नव्हे तर भाष्यकारही !!

**श्री.** 'सिनिक्' यांनीं सातत्यानें कथा लिहिल्या आहेत. ज्यांना ते इतर, ललित व टीकात्मक, लिखाणही विपुल करतात हें माहीत आहे, त्यांना 'सिनिक्'च्या निर्मिती वैभवाचा साश्चर्य (समत्सरही) हेवा वाटेल. पूर्वी 'मौज'मधून 'माणूस' व नंतर श्री. व्यंकटेश माडगूळकर यांनीं असेंच सतत लिहिलें होतें. गुणांचें मोजमाप संख्येनें करतां येत नसलें तरी लेखकाची साहित्याची आवड व संवेदनक्षमता या विपुल लेखनांतून सहज सिद्ध होते.

त्रोटक अभिप्रायांतून पुष्कळ वेळां 'सिनिक्' यांच्या अश्लीलतेची चर्चा होते. साहित्यिक दृष्टीकोनांतून पाहतां या संग्रहांतील कथांतून उत्तानता क्वचित् दिसते यांत शंका नाहीं. पण अश्लीलतेचा आरोप फार तर दोन कथांवरच करतां येईल. त्या म्हणजे तेरावी कथा—साला काट दिया— आणि एकविसावी कथा—कासंडी. उरलेल्या २७ कथा श्लील असतांना, केवळ हाच आक्षेप परत यावा हें उचित वाटत नाहीं.

पुस्तकाच्या मलपृष्ठावर श्री. 'सिनिक्' यांचा प्रादेशिक परिचय आहे. याच प्रदेशांत त्यांची साहित्यिक पूर्वपीठिकाही दिसेल. कै. वी. रघुनाथ यांचा उल्लेख निश्चित् करावा लागेल. वी. रघुनाथांशीं तुलना केल्यास श्री. सिनिक् हे दोन बाबतींत निराळे वाटतात. वी. रघुनाथांची भाषा सरळ व जोरकस होती. सिनिक् यांना नाम, विशेषण वा क्रियापदें यांची जोडगोळी प्रिय आहे. 'आभारां'त चित्र 'पूरक व वाचक' आहे. "नागरिक शालीनतेनें वागतात. संयम दाखवतात." "जिथें पाणीच पाणी होतें, तिथें रेतीच रेती दिसत होती." (पृ.८-९) "नजर तुझी नाजूक आणि बारीक खरीच" (पृ.३२) "वातावरण रोमांचांनीं फुललेले असतांना व उत्कंठेनें ओतप्रोत झालेले होतें तेव्हां" (पृ. ५२) "ओठ क्षणभर विलगले, पांढरे स्वच्छ टणक दांत चमकले." (पृ. ११३)

वी. रघुनाथांचा निवेदक कथनाशीं तदात्म होतो, श्री. सिनिक् यांच्यांत निवेदकाप्रमाणें भाष्यकारही आहे. भाष्यकार कधीं वाचकाला तात्पर्य सांगतो (कथा ८, ११, १६); कधीं तो पात्रांच्या कृतींच्या अनुषंगानें तत्त्वज्ञान बोलतो. (कथा १७, १९); कधीं तो पात्रांच्या भूमिकेचें रहस्य निर्देशून जातो. अशा रहस्यस्फोटाला सिनिसिझम् म्हणण्याचा प्रघात आहे. एरव्हीं श्री. सिनिक् यांची व्याप्ति मर्यादित नाहीं.

'सिनिक्' यांचा आकारही वैशिष्ट्यपूर्ण आहे. लघुकथा म्हणण्याऐवजीं त्या लघुतर व लघुतम कथा होऊं शकतील. लघुतम कथांचें तंत्र आतां रूढ झालें आहे त्याप्रमाणें शेवटीं पूर्ण कलाटणी देणारा धक्का बसावा लागतो. 'सिनिक्' यांची तुलना शब्दचित्रांशींही करतां येईल. दोन्हींत भाषेला काव्याचा नाद असतो, आणि दोन्हींत एका विशिष्ट क्षणावरं वाचक खिळतो. पण शब्दचित्रांत वर्णन होत असलेला प्रसंग वा क्षण हा स्वतंत्र राहतो. कथेमध्यें तो एका व्यक्तिजीवनाच्या वर्तुळाचें केंद्र होतो, एका घटनावलीचें टोंक बनतो. कथेंतील पात्रांच्या स्वभावांतून वाहणाऱ्या 'सरस्वती'चा संदर्भ प्राप्त झाला कीं, कथा परिणामकारक होते. या दृष्टीनें पाहतां 'निःश्वास' (कथा ३ री); 'जाळें' (कथा १५ वी), 'उपयुक्तता' (कथा १८ वी) दासराव, आदि आणि अंत (कथा २८ वी) या यशस्वी आहेत. या उलट क्षणचित्राच्या पातळीवर राहिलेल्या 'इंधन' (कथा ९वी), 'पक्षीकाम' (कथा १६ वी), 'भाजी' (कथा २३ वी), 'खोबरेल तेलाच्या बायका' (कथा २९ वी) या फसल्या आहेत.

कथेच्या आकाराप्रमाणेंच तिचा आशयही वेगळा आहे. लेखकानें तो स्पष्टपणें सांगितलाही आहे. "शय्येवर असतो एकटाच; पण एकलेपण नसतें. दिवसाभरात ज्वानीच्या निरनिराळ्या लोभस आकारांचे जे अनवधानानें लचके तोडलेले असतात, त्यांचा व्यक्तिमत्त्वाला गराडा पडतो. विकारांचा त्यांना एका आकृतिबंधात गोंवण्याचा फडफडाट चालू असतो. आणि सारें आकारहीन झालेले असते...." (पृ.५८)

तसेंच हेही पहा. "मला आपलें नेहमीं वाटत आले आहे कीं, जी आकर्षक आहे ती शेपटा सोडो, मोकळे केस ठेवो, उरोज अनावृत्त राहू देवो किंवा नाहीं, कशाही स्थितींत नजरा खिळवणारच. असें आहे तर देहाची आरास लोक डोळसपणें का करीत नाहींत ?" (पृ. ७०)

स्त्री-पुरुषांचें परस्पराकर्षण हें एक सनातन सत्य आहे. जेव्हां सामाजिक घटना/विघटना वेगानें होतात तेव्हां मूल्यांचा गोंधळ बाजूला सारून सनातन गोष्टी शोधाव्या असें वाटतें. इंग्रजी साहित्यांत डी. एच्. लॉरेन्स यानें हा सिद्धान्त ठाशीवपणें मांडला. तांत्रिक प्रगती करतांना या आकर्षणाचा प्रत्यय आला नाहीं तर जीवनाला वैफल्य, निराशा, ग्रासून जाते. "माझे मन म्हणत होते, हा वात्सल्यरस काय मुंबईच्या यांत्रिक व तांत्रिक जीवनावर मात करूं शकेल ?" (पृ. ७२) "प्रत्येकाला जाणवते कीं, आपलें जीवन समृद्ध नाहीं. मर्यादित आहे. जी स्थिरता आहे ती निर्जीव आहे. जी सुरक्षितता आहे ती बांझोटी आहे." (पृ. ८५).

विभूतीच्या मानसशास्त्राला 'सिनिक्'यामध्यें सामाजिक मानसाचा संदर्भ आहे. एखादा भावडा मार्क्सवादी असें म्हणण्याचा संभव आहे कीं, वांझोटी सुरक्षितता फक्त मध्यमवर्गाच्या व वरिष्ठ वर्गाच्या वांट्यांना येते. जणुं कांहीं कामगारांना व कनिष्ठ वर्गाला कौटुंबिक जीवनच नसते ! स्त्री-पुरुष संबंध, त्यांची तृप्ति व उपयुक्तता, हे प्रश्न आर्थिक शोषणाच्या चर्चेत बसत नाहींत. अन्य वृत्तीचे टीकाकार म्हणतील कीं, 'स्त्री' हाच शोषित वर्ग आहे व 'पुरुष' हाच शोषक वर्ग आहे. हा विग्रह मार्क्सवादी नसला तरी तसाच ठोकळेबाज आहे लक्ष्यांत ठेवण्याची गोष्ट अशी कीं, समान दर्जाच्या स्त्री पुरुषांतही आणि सर्वोदयी समाजांतही आकर्षण व साफल्य उरणारच आहेत. माणूस व माणसांचे संबंध स्थलकाल, इतिहास, सापेक्ष आहेत. औद्योगिक क्रांतिपूर्व (शेतकीप्रधान) जीवनाची लय वेगळी होती. औद्योगिक क्रांतीनंतरच्या जगाला अजून ती सांपडावयाचीच आहे.

**—गं. रा. पटवर्धन**

**['सिनिक्'या** — सिनिक्. प्रकाशक ग. रा. भटकळ, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई ३४. मूल्य पांच रुपये]








## एक आल्हादक व्यक्तित्व

**दोन** डिसेंबर १९६५ रोजीं मराठीतील एक नामवंत साहित्यिक, वक्ते वगैरे वगैरे म्हणून सर्वपरिचित असलेले प्राध्यापक अनंत आत्माराम काणेकर यांच्या वयाला साठ वर्षें पूर्ण झालीं. त्यानिमित्त त्यांच्या गौरवार्थ जे अनेक वाङ्मयीन व अवाङ्मयीन स्वरुपाचे उपक्रम महाराष्ट्रांत (म्हणजे मुंबई-पुण्यांत) हातीं घेतले गेले, त्यांतील भावनांशीं आम्हीं सहमत आहोंत. **'काणेकर साठ वर्षांचे झाले.'** हें सत्य असले व तें मनाला फारसें 'रुचत' नसले तरी 'पटवून' घेणें क्रमप्राप्त आहे. कारण त्यांच्या वयाला खरोखरच साठ वर्षें पूर्ण झालीं आहेत. काणेकर यांच्या ह्या 'सत्या'चा स्वीकार करायला माणसें एकदम तयार होत नाहींत याचें कारण खुद्द 'काणेकर'च (म्हणजे काणेकरांचे व्यक्तिमत्वच) आहेत. काणेकरांच्या व्यक्तित्वांत अनेक चांगल्या व पुष्कळदां दुर्मिळ असणाऱ्या गोष्टींचा सुंदर समन्वय साधला गेला आहे. कांहीं गोष्टी 'दैवायत्त' असल्या तरी बऱ्याचशा गोष्टी त्यांच्या खास कमाईच्या अशा आहेत. आकर्षक व प्रथम दर्शनी छाप पाडणारे शारीरिक व्यक्तित्व मिळणें ही गोष्ट कांहीं आपल्या हातची नाहीं. काणेकरांना हें लाभलें आहे. ज्यांनीं काणेकरांचे "तास" ऐकले आहेत, चर्चा, व्याख्यानें ऐकलीं आहेत. कांहीं खाजगी गप्पांचे व बैठकींचेही खुमासदार अनभव ज्यांच्या संग्रहीं आहेत त्यांना प्रत्येक वेळीं काणेकर हे 'हीरो'च वाटले आहेत. काणेकरांच्या सहवासांत कळत नकळत माणसें हंसरी होतात. आनंदी होतात. त्यांना विनोदबुद्धि नसली तरी त्यांना हंसूं फुटतं. कारण जीवनाकडे पाहण्याचा काणेकरांचा दृष्टिकोन मुळांतच 'प्रसन्न' आहे. अनुभवांचा ताजेपणा त्यामुळेंच त्यांच्या सहवासांत जाणवतो. काणेकर कधीं त्यामुळेंच 'जुने' झाले नाहींत. त्यांचं वय त्यांना 'वृद्ध' करूं शकलं नाहीं. मुक्त व्यक्तित्व हा काणेकरांचा एक खास विशेष आहे. त्यामुळेंच काणेकर हे कुठल्याही एखाद्या 'इझम'चे बळी झाले नाहींत. राजकीय, सांस्कृतिक सामाजिक व वाङ्मयीन अशा विचार प्रवाहांबाबतचे, कलांच्या विविधरुपी आविष्काराबद्दलचे काणेकरांचे कुतुहल आजही कायम आहे. विविध कमिट्यांवर कामें करूनही काणेकर कधींही 'बुक' झाले नाहींत. काणेकर केवळ 'गोडबोले' आहेत हा एक गैरसमज आहे. ते आपल्या कांहीं निष्ठांबद्दल, मतांबद्दल तितकेच आग्रही आहेत. फक्त हे आग्रह मांडण्याची, सांभाळण्याची काणेकरांची पद्धत कडवट नाहीं. त्यामुळें मतभेद व्यक्त करूनही काणेकर पुन्हां मूळ गोडवा कायम राखूं शकले आहेत. त्या मागें काणेकरांचे विशाल मन उभें असते. हें विशाल मन सारखा शोध घेत आहे. जीवनांतल्या विविध अनुभवांनीं ते पिचले, खचले नाहींत. त्याचें कारण डोळस नजर, शोधक दृष्टि आणि समाजाच्या विविध प्रवाहांशी समरस होत राहण्याचें धोरण स्वीकारल्यानें येणारी अनुभवांची संपन्नता, प्रवासाचे म्हणजेच नवे नवे पाहण्याचे, टिपण्याचे वेड, कविवृत्ति व जीवनातल्या संघर्षाकडे पाहण्याची व त्यांतलें नाटच टिपण्याची नाट्यानुकुल वृत्ति यांतून काणेकरांच्या व्यक्तित्त्वाला एक प्रकारचें आल्हादक रूप प्राप्त झालें आहे. काणेकरांनी एक 'कादंबरी'चा प्रांत सोडला तर वाङ्मयाच्या विविध क्षेत्रांत संचार केला. आणि **'चांदरात', धुक्यांतून लाल तान्याकडे, आमची माती–आमचे आकाश,** हीं वैशिष्टपूर्ण पुस्तकें दिलीं तशींच सुंदर नाटकें, कथासंग्रहही दिले. **'रूपेरी वाळू'** हा तर काणेकरी प्रतिभेचा व मिस्किलतेचा एक असामान्य आविष्कार आहे असें मला वाटते. **जीवनाला हंसत खेळत आणि हंसवीत हंसवीत सामोरे जाऊंया"** हाच जणुं काणेकरांच्या जीवनाचा व वाङ्मयाचा संदेश आहे असें मला वाटतें. हें वृत्तीचें तारुण्य ही एक कठिण साधना आहे. विशेषत: अकाली प्रौढ बनण्यास भाग पडणाऱ्या काळांत काणेकरांनीं सतत ती साधली आहे हाही एक योगच म्हणावा लागेल. नव्या जुन्याचा संगम साधूनही काणेकर सतत टवटवीत राहिले आहेत म्हणून **"काणेकर साठ वर्षांचे झाले ?"** हा प्रश्न त्यांच्या मित्र-सुहृदांना पडतो. **'काणेकर शंभर वर्षांचे झाले'** हें वाक्य ऐकतांनाही आम्हांला आनंदच वाटेल, कारण काणेकर ही "व्यक्ति" नसून "वृत्ति" आहे. ती वृत्ति नित्य नूतन राहणारी, सदा टवटवीत असणारी आल्हादक अशी आहे. त्या 'वृत्ती'ला आम्हीं उदंड आयुरारोग्य चिंतितो. ☆☆

## लोकमान्य 'दाजी' राजमान्य झाले

**'मॅन अॅण्ड हिज मिशन'** म्हणण्याची पद्धत आहे. प्रत्येग माणूस कांहींतरी 'मिशन' देऊनच पाठविला जातो. त्या त्या व्यक्तींत ज्या शक्ति-मर्यादा सांठविल्या असतील, त्या प्रमाणांत त्याचें 'मिशन'ही ठरत असते. त्या शक्तींच्या साक्षात्कारांतून तें तें 'मिशन' यशस्वी होत असते. तें लहान वा मोठे आहे हेंही अखेर त्या शक्तिमर्यादांतूनच ठरत असते.

**"दाजी भाटवडेकर"** हें नांवही कांहीं मिशन घेऊन आल्यासारखें वाटते. त्या मिशनचा सत्कार एखाद्या 'काकाजी'च्या रूपानें घडत असेलही. पण म्हणून कांहीं तो त्या एका भूमिकेचा सत्कार असत नाहीं. त्या मागच्या कांहीं साधनेचा, तपस्येचा तो सत्कार असतो. 'तुझें आहे तुजपाशीं'तल्या काकाजीसाठीं "दाजी" भाटवडेकरांचा जणुं जन्म झाला असें वाटावें इतकें असामान्य आगळेपण दाजींनी त्या भूमिकेंत ओतले. आणि एका रात्रींत चमत्कार घडावा तसे






'दाजी' नटवर्य झाले. दाजींच्या संपन्न 'व्यक्तित्त्वा'चाही जन्म जणुं 'काकाजी' साठींच झाला होता. ती भूमिका म्हणजे 'अभिनय कौशल्य' नव्हते, तर तें होतें 'भूमिका जगणे', तें होतें अंशात्मक तादात्म्य, तो होता एक मुक्त कलाविष्कार आणि काकाजी शामकडे दाद मागतात तशी दाद मागायची वेळ 'दाजीं'वर आली नाहीं. प्रेक्षकांनीं मुक्त मनानें ती दाद दिली. काकाजीवर दाजींचा ठसा ठसठशितपणें उमटला. त्या एका विशिष्ट उंचीवर राहण्याचे फार मोठे दायित्व जणुं त्या एका भूमिकेनें त्यांच्यावर टाकले. त्यांनीं त्यानंतर केलेल्या **पठ्ठे बापूराव, ऑथेल्लो**, **बाजीराव**सारख्या भूमिकांत त्यांचे कांहीं कौशल्य पणास लावलेही त्यांनीं, पण जनमानसावर खोलवर उमटलेला काकाजींचा ठसा कांहीं त्यांना पुसून टाकतां आला नाहीं. ह्यांत दाजींचा कांहीं दोष आहे असें नाहीं. त्या भूमिकेचे अंगभूत मोठेपण, आगळेपण हेंही त्याला कारणीभूत असले पाहिजे असें मला वाटते. वास्तविक 'काकाजी'च्या भूमिकेसाठीं दाजी साहित्य संघांत गेले नव्हते. काकाजीची भूमिका मिळणें हा दाजींच्या आयुष्यांतला एक गोड व संस्मरणीय अपवात होता. त्याचे त्यांनीं सोनें केले इतकेंच !

पण दाजी भाटवडेकर ह्यांची नाटयाला जी देणगी आहे ती वेगळीच आहे. ती केवळ काकाजी, ऑथेल्लोची नाहीं. ती संस्कृत नाटकांच्या पुनरुज्जीवनाची आहे. ब्राह्मणसभेच्या नांवानें दाजींनी संस्कृत नाटकांचे वेगळें दालन उघडले. आज गीर्वाण भाषा लौकिक अर्थानें मृत भाषा म्हटली जात असतांना जुनीं, अभिजात संस्कृत नाटकें सादर करण्याची कल्पना सुद्धां धाडसी वाटावी. पण दाजींनीं आपल्या चतुर सहकाऱ्यांनीशीं ती कल्पना आज कार्यान्वितच नव्हे तर बद्धमूल केली आहे. ठाण्यालाही (पुण्यालाही) आतां संस्कृत नाटकाचे पुनरुज्जीवन होते आहे. केंद्रीय शिक्षणमंत्री छगलांना 'संस्कृत'चें महत्त्व पटलेले आहे हीं सुचिन्हें होत. दाजींना सुदृढ शरीर, भरदार व आकर्षक व्यक्तित्त्व व पल्लेदार आवाज यांची नैसर्गिक देणगी लाभली आहे. त्यांची संस्कृत वाणी स्वच्छ व अर्थवाहिनी आहे. त्यांच्या संस्कृत नाटयसेवेचा व अभिनयादिगुणांचा समुचित सत्कार संगीत नाटक अकादमीनें केला आहे. यांत दोघेही अभिनंदनास पात्र आहेत—दाजी आणि अकादमी !! ☆ ☆

"१९६९ चे दिवाळी अंक"
हें परखड परिक्षण आणि
श्री. गोपालकृष्ण भोबे यांचा
**'नाटक कंपनीऽऽऽऽत मी'**
हा लेख स्थलाभावी या अंकांत जाऊं शकला नाही
तो पुढील अंकांत प्रसिद्ध होईल

—संपादक

# 'सहकारी' वामनराव

'**सहकार**' हा आजचा युगधर्म बनला आहे. आजच्या नव्या समाजाच्या निर्मितीचा तो एक प्रमुख आधार आहे. सामान्य जनतेचे सामान्य प्रश्न असामान्य सहजतेनें सोडविण्याचें साधन म्हणून 'सहकारा'चा एक महान प्रयोग ह्या देशांत केला जात आहे. एक पायाभूत तत्त्व म्हणून आज तें मानलें जात आहे. परंतु हें तत्त्व प्रत्यक्ष आचरणांत आणून, त्यांतल्या सर्व लहानसहान गुणदोषांचा डोळसपणें अभ्यास करून ते दोष काढून टाकण्याचा जाणीवपूर्वक प्रयत्न करून, सहकाराची कार्यकक्षा विस्तृत करण्याचे सचोटीचे प्रयत्न ज्यांनीं केले त्यांत **वामन पुंडलीक वर्दे** यांचे नांव प्रामुख्यानें घ्यावें लागेल. विशेषत: ज्या काळांत त्यांच्या पदवीभोंवतीं अनेक आकर्षक प्रलोभनें उभी होती, अनेक चांगली आर्थिक आवाहनें त्यांना मिळू शकत होती, त्या काळांत वामनरावांनीं एका ध्येय दृष्टीनें **सहकारक्षेत्र** निवडले. तेथल्या मर्यादित कार्यकक्षेंतही असामान्य असे कांहीं प्रयोग करणें त्यांनीं पसंत केले. सहकारी कार्यासाठीं आवश्यक असलेले पायाभूत ज्ञान संपादन करण्यासाठीं त्यावेळच्या राज्य सहकारी बँकेंत त्यांनीं नोकरी पत्करली. ती पत्करतांना व सोडतांनाही (शेवटी ते मॅनेजिंग डायरेक्टर झाले होते) त्यांची धारणा एकच होती "मी एका संस्थेची नोकरी करीत आहे असें नाहीं. मी एका चळवळीची सेवा करीत आहे. त्या चळवळीचे द्वारें माझ्या समाजाची वा देशाचीच सेवा करीत आहे." कारण सहकारी बँक ही इतर बँकांप्रमाणें बँक नाहीं तर तें एक समाजसेवेचे केंद्र आहे अशीच त्यांची धारणा आहे. प्रतिकूल परिस्थितींत आयुष्याची सुरुवात करून बँका व सहकार ह्या क्षेत्रांतली सर्व मानाची बिरुदें वामनरावांनीं स्वकर्तृत्वानें भूषविलीं. सहकारी साखर कारखाने, सूत गिरण्या, नागरी सहकारी बँका आणि महाराष्ट्राची एक अग्रेसर बँक म्हणून परिचित असलेली **'बँक ऑफ महाराष्ट्र'** ह्या संस्थांच्या उभारणींतला, त्यांच्या विकासांतला वामनरावांचा वांटा हा सिंहाचा वांटा आहे. **"महाराष्ट्राला स्वतंत्र बँक हवी"** घ्या केसरीतल्या लेखांत त्यांनीं तें स्वप्न मांडले. आणि सुप्रसिद्ध अर्थशास्त्रज्ञ वा. गो. काळे वगैरेंच्या सहकार्यानें तें साकारही करून दाखविले. **'शेअर बाजार'** हें एक मोठें कोडे आहे. ते कांहीं एका विशिष्ट वर्गालाच सुटते ही धारणा बदलणारे जे कांहीं महाराष्ट्रीय आज त्या धंद्यांत पाय रोवून उभे आहेत त्यांत वामनरावांच्या मालकीच्या नावर कंपनीचा प्रामुख्यानें उल्लेख करावा लागेल. कर्तृत्वाचे फार मोठे प्रतिक म्हणून सारस्वत सहकारी बँकेचा नामोल्लेख करावा लागेल. सहकारी बँकेचे मॅ. डायरेक्टर असतांना अनेक बुडत्या सहकारी बँकांना व संस्थांना त्यांनीं कुशलतेनें सांवरले आहे. तें करतांना सहकारी चळवळीवरचा विश्वास उडतां कामां नये ही व्यापक भूमिका त्यांच्या मनांत होती. आज साखरकारखान्यांचे जाळें महाराष्ट्रांत पसरलेले दिसते आहे. पण तें जाळें मन:चक्षूंपुढें आणले वामनरावांनीं. आज वामनरावांची महत्त्वाचीं स्वप्नें साकार झालीं आहेत. राज्य सहकारी बँक, महाराष्ट्र बँक, सारस्वत बँक, नावर कंपनी ह्या साऱ्या गोष्टी सुस्थिर व सुकीर्त झाल्या आहेत. कष्टसिद्ध व कर्तृत्वशाली जीवनानें यश पाहिले आहे. आणि तरीही वामनरावांना 'अहंकाराचा वारा' लागलेला नाहीं. शांत, संयमी, स्वत:बद्दल कमी बोलणारे, संकोची व्यक्तित्त्व त्यांना लाभलें आहे. वामनरावांच्या कृतार्थ 'सत्तरी'ला आम्हीं अभिवादन करतो. अर्धविकसित भारताचे अर्थकारण समर्थ करण्यासाठीं वामनरावांनीं **'दीर्घायु'** व्हावे ही प्रार्थना करतो.

—आदित्य

**राजकारण**




## शस्त्रांनंतर आतां शब्दांचें राजकारण

**संयुक्त** राष्ट्र संघटनेची (तथाकथित) शांतता दळें युनो–सचीव ऊ थाँण्ट साहेबांचा आदेश घेऊन भारताच्या व पाकिस्तानच्या भूमींत डेरे दाखल झालीं असून ह्या उपखंडांत शांतता स्थापन करण्याचे प्रयत्नांत दंग आहेत असें ऐकतो. ती शांतता म्हणजे नेमकें काय व त्यांचा प्रयत्न जारी असला तर तो नेमका कुठें जारी आहे हें कळणें तूर्त तरी कठिण झालेलें आहे. कारण भारत–पाक संघर्ष ज्या ज्या भूमीवर घडला (व घडलाही नाहीं) त्या त्या सर्व ठिकाणीं अजून तोफा गरजताहेत. माणसें मारली जात आहेत. गांवें बेचिराख होताहेत. जनावरे व स्त्रियांचे अपहरणही केले जात आहे. त्यामुळें युनोच्या सीज्–फायरचा मराठी (वा भारतीय) अर्थ लावणें सांप्रत दुरापास्त झालें आहे. 'सीज् फायर' ही आज्ञा फक्त भारतीय शासनालाच उद्देशून होती कीं, पाकलाहि ती लागूं होती हा एक संशोधन विषय ठरावा. युनोनें आणखी एकादी तज्ञांची समिति प्रस्तुत संशोधनासाठीं पाठवावी अशीहि शिफारस करावीशी वाटते. तें कांहींही असले तरी रणांगणावर पाकिस्तानी लष्करशाहीचा नक्षा भारतीय जवानांनीं पार उतरविला असून त्यांच्या सर्व स्वप्नांवर निखारे ठेवले आहेत. रणांगणावर अमेरिकन कृपेनें मिळालेल्या पॅटन्स आणि सेबर्सच्या जिवावर आपण काश्मीरचा 'निकाल' लावूं व दिल्लीवरही रणगाडे घेऊन जाऊं असा कयास पाकच्या नेत्यांनीं बांधला होता. १९६२ चे चीनी आक्रमण व कच्छचे रणांतील लढाई या दोन अनुभवांवर हे कयास आधारलेले होते. पण यावेळची लढाई हा एक राम टोला होता हें त्यांच्या ध्यानीं आले व जगालाही एक वेगळें भारत–दर्शन घडलें. त्याचा परिणाम म्हणूनच अमेरिका–रशियानें पाकला 'युद्धबंदी'चा सल्ला दिला व आतां हा संघर्ष रणांगणावरून निघून परिषद–टेबलावर जाऊन बसला आहे. अमेरिकन राष्ट्राध्यक्ष जॉन्सन व रशियाचे पंतप्रधान कोसीजिन ह्या दोघांनाही भारताची कणखर भूमिका दखल घेण्याइतकी महत्त्वाची वाटूं लागली असून चीनचा जागतिक धोका व त्याला तोंड देण्याइतकीं अंगभूत ( Potential ) अशी प्रतिकारशक्ति भारताजवळच फक्त आहे याचीही खात्री अमेरिका–रशियाला पटली आहे. चीननें आपले हेतु कधींच लपविलेले नाहींत, उलट चीनचे युद्धखोर व शांतता विद्रोही धोरण सतत स्पष्ट होत आले आहे. अणुबाँबना बंदी घालावी, चांचण्या रद्द कराव्या अशी मागणी सर्वत्र होत असतांना चीन मात्र युद्ध, अणुबाँब व मानव संहार ह्या गोष्टी अपरिहार्य आहेत असेंच मानीत आहे. त्यामुळें जागतिक युद्धाची भीति ही एक टांगती तलवार आशिया व मध्यपूर्व अशियांत खडी राहिली आहे. ह्या परिस्थितींत समर्थ भारत उभा झाला तर तो आज रशिया–अमेरिकेला हवा आहे. कारण भारत–चीन युद्ध कधीं घडलेंच तर ती फार मोठ्या संहारक अशा जागतिक युद्धाची नांदी ठरेल हें जॉन्सन, कोसीजिन जाणतात. पण पाकिस्तानची युद्धखोरी ध्यानीं घेऊनही ते पाकिस्तानला दुखवीत नाहींत, कारण त्यामुळें आपण होऊन पाकला पेकिंग कँपमध्यें ढकलण्याचे पाप घडेल अशी भीति त्यांना वाटते. अमेरिकेनें जसा भारतांत पैसा ओतला आहे. धान्य ओतले आहे. तसाच तो पाकमध्येंही ओतला आहे. तो ओततांना कांहीं 'चॅरिटी'ची कल्पना मनांत बाळगून ओतला नाहीं. जगाचा सत्तासमतोल राखण्याची, पैसा खेळता ठेवण्याची व मित्र संख्या वाढविण्याचीच कल्पना त्याच्या मुळाशीं होती. रशियाला आज चीनच्या संघर्षाच्या पार्श्वभूमीवर भारत मैत्रीची गरज आहे. रशियानेंही ही भूमिका कांहीं स्वार्थ मनांत ठेवूनच घेतलेली आहे. पण पाकलाही त्याला कह्यांत ठेवायचा आहे. कारण पाठींत खंजीर बाळगून एकाकी भारत चीनशीं युद्ध करूं शकणार नाहीं हे रशिया जाणतो. ह्या दोन देशांत दीर्घकाळ वैर चालूं राहणें हें अस्वाभाविक आहे. अंतीं कुणाच्या व जगाच्याही तें कल्याणाचें नाहीं हे अमेरिका–रशिया जाणतो. म्हणूनच ताश्कंद येथें भारत–पाक संबंधाबाबत कांहीं बोलणीं करण्यासाठीं रशियानें शास्त्री–अयुबना पाचारण केले आहे. या बैठकींत कांहींतरी चांगलें घडेल अशी वांझोटी आशा बाळगण्यांत तसा अर्थ नाहीं कारण ह्या नात्याबाबतचा Basic approach च पाकनें बदलणें आवश्यक आहे. एकीकडे वाटाघाटीच्या घोषणाही होत आहेत. आणि एकीकडे काश्मीरपासून राजस्तानपर्यंत व बंगाल–आसाममध्यें तोफाही गर्जत आहेत. काश्मीरचे तुणतुणें चालूंच आहे. आणि 'काश्मीर प्रश्न' नाहीं असें उत्तर ना. शास्त्री देत आहेत. म्हणजे मूलभूत मतभेद कायम आहेत. मोठ्यांच्या मध्यस्थीनें व एका हातीं 'चीन–दोस्ती'ची धमकी बाळगून जास्तीत जास्त फायदा मिळवायचा व रणांगणांत जें गमावलें तें टेबलावरच्या लढाईंत जिंकण्याची (अखेरची) धडपड करायची हा पाक मनसुबा आहे.








## सन्मित्र हरपला

'दीपावली'चे एक प्रथमपासूनचे सुहृद, आमचे एक सन्मित्र व विख्यात लेखक पु. भा. भावे यांचे बंधु डॉक्टर **वासुदेव भास्कर भावे** ह्यांना गेल्या महिन्याच्या सात तारखेला हृदयविकारानें आकस्मिकपणें देवाज्ञा झाली. टोपीवाला नॅशनल मेडिकल कॉलिजमध्यें डॉक्टर भावे **हे** प्राध्यापक म्हणून काम करीत होते. शीव येथील म्यु. पल हॉस्पिटल व मेडिकल कॉलिजचे डीन म्हणून त्यांची नेमणुक झाली होती. त्या नेमणुकीबद्दल त्यांचा सत्कार होणार होता. त्यासाठीं निघण्याचे तयारींत असतांनाच त्यांना झटका आला. त्यांच्या पत्नी डॉ. मंगलाबाई डोंबिवली स्थानकावर त्यांची वाट पाहात होत्या. त्या धांवत आल्या. उपचार सुरू केले गेले. पण अवघ्या दहा पंधरा मिनिटांतच सारा खेळ संपला. कुणाचाही विश्वास बसला नाहीं. पण सत्य नेहमींच भयानक असतें–मृत्यूबाबतचे !

डॉक्टर भावे हे केवळ सुविख्यात प्राध्यापक, हुशार संशोधकच नव्हते तर ते निर्मळ मनाचे, उदारधी, रसिक मनाचे, श्रद्धाळू वृत्तीचे एक सन्मित्र होते. जीवनांतल्या सर्वच गोष्टींबद्दल डॉ. भावे अतिशय Methodical होते. 'शिस्त' हा त्यांच्या स्वभावाचा एक अविभाज्य भाग होता. झटका आल्यानंतर त्यांनीं प्रथम सत्कार समारंभाच्या सेक्रेटरीला फोन करायला मुलाला सांगितलें. भावावर त्यांचे निरतिशय प्रेम होते. त्याच्या ुणाबद्दल व वाङ्मयीन कर्तृत्वाबद्दल त्यांना फार अभिमान होता. त्याच्या लेखनाचे व त्याच्या वाङ्मयासंबंधींच्या लेखनाचे डॉ. भावे हे उत्तम संकलक होते. सर्व कात्रणें ते जपून ठेवीत. **'आम्हीं भाऊ आहोंत त्यापेक्षां आम्हीं एकमेकांचे चांगले मित्र आहोंत'** असं डॉ. भावे पु. भां. बद्दल म्हणत असत. भावे बंधूचे प्रेम व मैत्री हा सर्व परिचितांमधला एक आदरविषय होता. लंडन विद्यापीठाची **फार्माकॉलॉजी** ह्या विषयांतली **'डॉक्टरेट'** त्यांनीं संपादन केली होती. व त्यांचीं कांहीं वैद्यकीय संशोधनें पाश्चात्यांनींही स्वीकारली होती. प्रथम श्रेणीचे विद्यार्थी, हुशार व मनमिळाऊ स्वभावाचे प्राध्यापक म्हणून ते परिचित होते. त्यांच्या मृत्यूची वार्ता कळतांच विद्यार्थी-विद्यार्थिनींची जी यात्रा डोंबिवलींत भरली ती बोलकी होती. घरंदाज श्रीमंती भोगून व प्रथम श्रेणीचे मान मिळवूनही डॉ. भावे हे निगर्वी होते. स्वतःबद्दल अतिशय कमी बोलणारे गृहस्थ होते. त्यांच्या उदार मनस्कतेची तर अनेक 'बोलकी' उदाहरणें आम्हांस ठाऊक आहेत. नाट्य, चित्रपट, संगीत व साहित्यांत हा माणूस रसज्ञ होता. त्यांचा सहवास ही एक 'एंजॉयमेंट' होती. आज आम्हीं एक मित्र-सुहृद गमावला आहे. पु. भा. भावे, डॉ. मंगलाबाई भावे यांच्या व अन्य कुटुंबियांच्या दुःखांत आम्हीं सहभागी आहोंत. ईश्वर मृतात्म्यास शांति देवो.

**–संपादक**

सार्वमताची कल्पना अमेरिकेनें सोडून दिली आहे. स्वाग्रस्त काश्मीरवर पाकनें समाधान मानावें अशी रशियाची सूचना आहे. ह्या कात्रींतून मार्ग काढणारें खंबीर मन शास्त्रीजींजवळ आहे कीं, नाहीं याचीच कसोटी ताश्कंद–वॉशिंग्टनला लागणार आहे. "आम्हीं अन्नासाठीं देशाचे सार्वभौमत्वाबाबत कुणालाहि Blackmail करूं देणार नाहीं" असें शास्त्रीजी म्हणाले आहेत. परंतु त्यासाठीं ह्या देशाच्या शेतीविषयक धोरणांत ज्या मूलभूत चुका झालेल्या आहेत त्या (पराभव मान्य करूनही) सुधारण्याची गरज आहे. 'माझी शेती' ही भावना जोंपर्यंत मूळ धरीत नाहीं तोंपर्यंत धान्यांचे ढीग दिसणार नाहींत. ती कांक्षा फुलविणें, शेतकऱ्याला सर्व साधनें उपलब्ध करून देणें ही गरज आहे. ताश्कंद–वॉशिंग्टनला राजकीय विचार करतांना हीं सारीं व्यवधानें शास्त्रीजींना सांभाळावी लागतील. अमेरिका–रशिया सार्वभौमत्वाशीं कुणाला खेळूं देणार नाहींत. आपणही ठाम भूमिका घेऊन जसा जगाचा विश्वास संपादन केला आहे. तशीच खात्री रशिया-अमेरिकेची जर पटवूं शकलो तर चीनचे जागतिक (व प्रामुख्यानें भारतीय) संकट आपण तरून जाऊं. जग आपल्या-पाठीशीं खंबीरपणें उभें राहील. "ग्रहांचे साह्य शूरांना. यशः श्री पायिंची दासी" असें कवि म्हणतो.

### 'सोमवार' पाळूं या !!

**सोमवार** पाळूं या सोमवार ! याने के एक दिवस एक जेवण बंद! भात बंद. चपाती बंद. चूल बंद !! ऐकायला कसेंसेंच वाटते ना ? पण कुठला तरी वार पाळणारी आपण माणसें ! कुणीं गुरुवार तर कुणीं शनिवार. पण 'वार' लावून जगणारीं आपण माणसें. त्यामागें कांहींच्या मनांत 'देवा'चा विचार असतो. कांहीं 'आरोग्य' विचार करतात. पण आतां जो सोमवार पाळायचा आहे त्यांत देवाचा व आरोग्याचाही विचार तर आहेच. पण आणखीही एक विचार आहे. आपल्या देशाचा विचार आहे. देशाच्या मान सन्मानाचा विचार आहे. 'जोगवा' कीं 'मान' अशा पेंचांत तुम्हीं काय पत्कराल ? भीक कीं भूक यांत काय मानाचें वाटेल तुम्हांला ? राष्ट्राचीं अस्मिता कीं, सार्वभौमत्वाचा सौदा असा सवाल उभा राहील तेव्हां तुमचें अंतर्मन काय कौल देईल ? सरकारी पाटर्यांचे काय ? असा सवाल तुमच्या मनांत खदखदतो आहे हें मला ठाऊक आहे. कामराज हे ह्या देशाचे राज्य चालविणाऱ्या व मोठें तत्त्व सांगणाऱ्या पक्षाचे अध्यक्ष आहेत हें मला ठाऊक आहे. परवां ते मीरतला गेले तेव्हां ते कसे गेले ते मला ठाऊक नाहीं म्हणतां ? त गेले त्या एका दिवसाच्या भेटीप्रीत्यर्थ जिल्हा काँग्रेसनें किती काटकसरीनें खर्च केला आहे कां ठाऊक?–पसतीस ते चाळीस हजार रुपये फक्त! ( only ) सुरक्षेसाठीं (कुणाच्या ?) म्हणे चार हजार पोलीस तीन दिवस खपत होते. त्याचाच खर्च वीस हजार रुपये झाला. आतां बोला–हा जास्त झाला कां ? दिल्ली शहादरा मार्गावर ५० गाड्यांच्या मिरवणुकीनें कामराज गेले. त्यांतल्या ३० गाड्या भाड्यानें घेतल्या होत्या. शिवाय दोन जीप्स होत्या. दर दहा मैलावर बदलणारा मोटारसायकलवाला होता व परकी प्रवाशांसाठीं वापरल्या जाणाऱ्या श्रीमंती








टॅक्सीतून स्वतः कामराजांनीं प्रवास केला. १०० कमानी (फक्त) उभारल्या होत्या. वैरूटला गांधी उद्यानांत फक्त ७०० जणांना चहा पाणी (व खाना) पार्टी झाली. निवडणुक निधीसाठीं त्यांना ६७,००० रुपयांची थैली देण्यांत आली. मीरतला सौ. कमला चौधरी यांच्या घरीं एक झकास खाना दिला गेला. तुमच्या घरीं लग्न असले तर **फक्त पंचवीसच** माणसांना बोलवा व **दोनच पदार्थ** करा, असा निर्बंध ठाऊकच असेल म्हणा. पण कामराज–खान्यासाठीं फार नाहीं **फक्त शंभराच्यावर** पाहुणे आले होते म्हणे. फक्त **पांच प्रकारची** मिठाई होती व **अकरा** इतर पदार्थच होते. पुरी व पुलाव हवेच नाहीं कां ? हें वाचून तुम्हीं अस्वस्थ झालांत ना? व्हालच ! तरीही 'सोमवार' पाळूं या. जनतेनें नेत्यांना धडे शिकवले पाहिजेत असाच जमाना आहे. ज्या देशांतली जनता जागृत (व जागरूक) असते तेथें असले 'झोंपाळू' कार्यक्रम फार काळ चालूंच शकणार नाहींत. आपण सोमवार पाळणें ही आजची 'गरज' आहे. 'उद्यां'च्या जगण्यासाठीं 'आज'चा हा उपवास ! युद्धकाळांत इंग्लिश लोक म्हणे पाव खाऊन राहिले, पण त्यांनीं शान व मान ताठ राखली: चर्चिलच्या खंबीर नेतृत्वानें 'व्ही' मिळवून दिला. शास्त्रीजी हे आमचे चर्चिल आहेत. 'बोले तैसा चाले' अशा कृतीचा हा माणूस आहे. तो बोलला आणि त्याच्या घरची 'चूल' त्या दिवशीं पेटली नाहीं. अंगात अंगार पेटला असला कीं माणूस भूकतहान पार करतो हें जतीन्द्र दासांनी सिद्ध केले होते. आम्हीं त्या परंपरेचे वारस आहोंत ना? सोमवार हा 'शिवा'चा वार ! शिवाची उपासना 'शिवकर'च ठरणार, नाहीं कां ? ह्या देशाचें शिव आणि आपलें 'शिव' याची सांगड त्या शिवानेंच घातली आहे मग ही शिवोपासना सफल होण्यासाठीं आज सोमवार पाळूं या. उपासतापास हीहि एक उपासनाच ! आपले जवान हिमालयाच्या साक्षीनें त्या गौरीशंकराची उपासना करताहेत. आपण इथें बसून ही उपासना करूं या.–त्या गौरीशंकराच्या गौरवासाठीं व आपल्या अंतिम 'शिवा'साठीं !! अखेर कशाचे तरी 'मोल' दिल्याशिवाय ह्या जगांत कांहींही 'मौलिक' मिळत नाहीं. डु यू अॅग्री ?

मग सोमवार पाळूं या !! पूर्वी स्वातंत्र्यासाठीं कुणी साखर, चहा, विदेशी कापड सोडीत, मग असंख्यांच्या त्यागांतून उभ्या झालेल्या स्वातंत्र्यासाठीं आपण एक 'सोमवार' पाळूं या ! एकच वार !!

## मुत्सद्देगिरीला काळाचीं आव्हानें

**भारत**–पाक संघर्षानें भारत पाक राजकारणांतच केवळ नव्हे तर एकंदर राजकारणविषयक दृष्टिकोनच बदलून टाकला असल्याचें एक सुचिन्ह आज दिसून येत आहे. त्या अनुभवांना कांहीं 'जबर' मोल द्यावें लागले आहे हे खरें असले तरी **"सुधारणेला केव्हांच फार उशीर झालेला नसतो"** ह्या म्हणीप्रमाणें धोरणांत मूलभूत फरक केला तर तो अजूनही उपकारक ठरण्याची शक्यता आहे. राजकारणांत नेहमीं शस्त्रांचाच वापर आवश्यक असतो असें नाहीं. किंवहुना राजकारण हा मुत्सद्यांचा (म्हणजेच कांहींच्या मतें scoundrals चा) खेळ मानण्याची पद्धत आहे. तिथें आधीं शब्द लढतात. बुद्धि डावपेंच लढवीत राहते आणि 'शस्त्राचार' हा त्या नीतीचा शेवटचा अध्याय असतो. भारत-पाक संघर्षानें भारतीय युद्धनीतीला जसें आव्हान दिले, तसेंच बुद्धि-नीतीलाही आवाहन केलें आहे असें दिसते. तें आवाहन बहिऱ्या कानीं गेले नाहीं कारण तिबेट, पख्तूनचा लढा व पूर्व पाकिस्तानमधील अयूब विरोधी उठाव ह्या तीन्हीं बाबतींत भारतीय राजशासनानें कांहीं नवें धोरण स्वीकारल्याचें दिसते आहे. विशेषतः तिबेटबद्दलचे धोरण हें खास नवें धोरण म्हटले पाहिजे. कारण तिबेटबाबतचें पूर्वीचें धोरण हेंच अंतीं आपल्या अंगलट आले आहे. चिनी हेतूंची भयानकता त्यावेळीं आपल्याला कळली नाहीं म्हणा वा जग मैत्रीच्या कल्पनेचा कैफ अधिक डोक्यांत होता म्हणून म्हणा, तिबेटचा घांस आपण फार थंड डोक्यानें चीनला घेऊं दिला. चिनी झपाटा जेव्हां 'नेफा'त व 'लडाख'मध्यें जाणवला तेव्हां प्रथम भारतीय शासनाला जाग आली. त्यांतून आतां 'शुद्ध' येत आहे. जागतिक राष्ट्रसंघटनेंत चीनच्या विरुद्ध गाऱ्हाणें मांडण्याची कल्पना पूर्वी मान्य होत नव्हती. दलाई लामांना आश्रय देतांना अनेक निर्बंध आम्हींच आपण होऊन त्यांच्यावर घातले. पाक–चीनी शस्त्रें घेऊन नागा जर उपद्रव देऊं शकतात तर भारतीय शस्त्रास्त्रें वापरून तिबेटच्या अंतर्गत उठावाला भारतांत आलेल्या तिबेटी निर्वासितांनीं साथ देण्याची कल्पना राजकारणांत धर्म्य कां ठरूं नये ? पण तिबेटी वंश विच्छेद आम्हीं शांत मनानें (खरं म्हणजे कोडग्या मनानें–कारण त्या पापाचे आम्हीं अंशतः धनी होतो–आहोंत) पाहिला. चिनी आक्रमणाचे वेळीं त्यांचा हेरगिरीसाठीं उपयोग करतां आला असता. तिबेटी भूमीची मर्मस्थानें जाणून घेतां आलीं असती असेंहि म्हटलें जाते. पण युद्ध नको, युद्धोन्माद नको हेंच राष्ट्रीय घोष वाक्य असल्यानें त्यावेळीं आम्हीं यांतलें कांहीं केलें नाहीं. आज तिबेटच्या भूमिकेला आम्हीं युनोत पाठिंबा देऊं अशी नवी भूमिका आम्हीं घेतली आहे. 'पख्तून'च्या मागणीला त्यावेळीं महात्माजींनीं आशिर्वाद व सहाय्य–वचन दिलें होते. आज तें वचन आम्हीं पूर्ण करण्याची निदान भाषा तरी करूं लागलो आहोंत. पख्तूनचा लढा भारत–पाक संघर्ष जारी असतांनाच एका तेजींत आला होता. त्यावेळीं दुहेरी रेटा वाढवीत नेला गेला असता तर पाकची कंबर–मोड झाली असती. आज पूर्वपाकमध्यें अयूब राजवटीविरुद्ध बंडखोरी वाढत आहे. पण ब्रिटिशांनी जशी क्रांतिकारी चळवळ दडपून टाकली तशी तीही चळवळ दडपली जाण्याची शक्यता आहे. त्या चळवळीचे नेतृत्व कांहीं बंगाली हिंदु–मुस्लिम क्रांतिकारक करीत आहेत. त्यांचे नाते ह्या भूमीशी आहे हें ध्यानीं घेऊन व राजकीय डाव म्हणूनही पूर्वपाकला एकाकी पडूं न देणें हें राजनीतींत बसतें. जिथें जनतेचा नैतिक पाठिंबा उरत नाहीं, तिथें राजवट कोसळते. त्यावेळीं क्रांतिप्रयत्न तीव्र करणें हें उचित असते. बंगालला आज आम्हीं केवळ नैतिकच नव्हे तर सक्रिय पाठिंबा दिला पाहिजे. पाक–हेरगिरी भारताच्या अंगागांतून थैमान घालण्याचा प्रयत्न करीत आहे हें या युद्धाचे वेळीं (व पूर्वीही) ध्यानीं आले आहे. शत्रूचे मनसुबे ओळखणें, त्यावर मात करणारे डाव टाकणें व त्याच्याच घरांत 'भेद' असल्यास तो पोसणें हें धर्म्य ठरते–हेंच तर राजकारण ! आज चीन–पाकचे हेतु स्पष्ट झाले आहेत. म्हणूनच राजकारणांतला बदलही स्वागतार्ह ठरेल. तो अपरिहार्य आहे.

**–सारस्वत**







अनुक्रमणिका

[पान १० वरून –श्री. ना. पेंडसे]

**पें.** :– 'गारंबीचा बापू' लिहीत असतांना मी एका विलक्षण धुंदीत होतो. (त्यावेळच्या डायरींतली कांहीं पानें पेंडश्यांनीं मला वाचून दाखविली. ती वाचतांना जणुं ते त्या काळांत गेले. वाचतां वाचतां त्यांनाच हंसू आवरेना. आम्हीं सारेजण त्या आनंदात सहभागी होतो–सौ. पेंडसे, कुमार पेंडसे व मी) आपण कांहींतरी वेगळेंच लिहीत आहोंत अशी एक फार मोठी जाणीव मनाला खुलवीत होती. आणि ती कादंबरी लोकांनींही नांवाजली तेव्हां मला खरें समाधान झालें. पण 'रथचक्र'ने मात्र क्षणोक्षणीं माझी कसोटी पाहिली. तें सारें वर्ष मी खूप अस्वस्थ होतो.

**प्र.** :– सुस्थितीचा आणि चांगल्या सकस साहित्य निर्मितीबाबतचा एक विचार आपल्याकडील लेखकांबाबत नेहमीं चर्चिला जातो. आपणांस काय वाटतें ?

**पें.** :– सुस्थितीचा आणि चांगल्या व सकस साहित्य निर्मितीचा कांहींही संबंध नाहीं. चांगली साहित्य निर्मिती ही केवळ त्यावर अवलंबून नाहीं.

**प्र.** :– आपण जवळजवळ चाळीस वर्षें मुंबईंत आहांत. आपलें शिक्षण, व्यवसाय व कळत्या वयांतले सारे भावजीवन मुंबईत घडले असतांना आपल्या वाङ्मयांत त्याचे कुठेंही आलेख येत नाहींत हें कसे ? कोंकण मात्र सातत्यानें येतें हें कसे ?

**पें.** :– आश्चर्य वाटेल; पण माझं मन अजूनही इथें रमत नाहीं. मला येथें पाहुण्यासारखें वाटते. मला इथें आपुलकीचे Feeling च कधीं आलें नाहीं हें खरें !

**प्र.** :– याचं कांहीं Analysis करण्याचा प्रयत्न केलाय् काय ?

**पें.** :– तसा जाणीवपूर्वक प्रयत्न केला नाहीं. पण इथें जीवन क्षणाक्षणाला बदलत जाते. नवीं रूपें घेत जाते. कोकण मात्र अजून तेंच आहे. अस्सल आहे. सच्चें आहे असें वाटते. माझा तो भाग मित्र आहे असें वाटतें. प्रत्यक्षतः माझे मित्र तेथें नाहींत. पण मी त्या मातींत रमतो. त्यामुळेंच 'दापोलीत वीज येणार' ह्या वार्तेनें माझ्यांतला लेखक अस्वस्थ होतो. कोंकणांत निसर्गाप्रमाणेंच माणसाचेही मूळ रूप पहायला मिळते आणि म्हणून मला त्याची ओढ वाटत असावी.

**प्र.** :– आपल्या कादंबऱ्यांत उत्कट प्रणय प्रसंगांची त्रुटि जाणवते. कांहीं कारणमीमांसा ?

**पें** :– कारण कांहीं सांगतां येत नाहीं पण 'एल्गार' लिहितांना चटकदार प्रेम प्रकरणें न घालतांही मी कादंबरी interesting करून दाखवीन असा मनाशीं निश्चय केला होता. त्या निश्चयाच्या पकडीतून मी कदाचित अजूनही सुटलो नसेन.

**प्र.** :– सृजनशील साहित्य निर्मितीला व विकासाला टीका कितपत उपयोगी वा उपकारक ठरते ? आपला अनुभव ?

**पें.** :– टीकाकार, टीका उपयोगी, उपकारक ठरत नाहीं.

**प्र.** :– आपला उत्तम टीकाकार कोण ?

**पें** :– श्री. ना. पेंडसे ! श्री. ना. पेंडशांइतके माझ्या कादंबऱ्याचें कोणीही वाभाडे काढले नाहींत. ह्या गृहस्थांची टीका अत्यंत मर्मग्राही व वैगुण्यांवर अचुक बोट ठेवणारी असते असें मला आढळून आलें आहे. इतका समर्थ टीकाकार मला दुसरा आढळला नाहीं.

**प्र.** :– आपण कथानकांची चर्चा करतां ? लेखन कुणाला आधीं वाचून दाखवितां ?

**पे.** :– कथानकांची चर्चा करीत नाहीं. पण मी कांहीं ठरलेल्या मित्रांना सांगतो. सांगतांना कथा पक्की होत जाते. दुवे सांपडतात. संदर्भ सुचतात. लेखन मात्र मी वाचायला देतो. वाचून दाखवीत नाहीं.

**प्र.** :–आपला पहिला वाचक कोण ?

**पे.** :– ठरलेला नसतो. कांहीं ठरलेल्या माणसांपैकीं कुणींतरी एक तो असतो एवढें खास !!

**प्र.** :– लेखनाची धुंदी चढते ?

**पे.** :– खूप चढते. अगदीं Tense, excited असा मी असतो. त्या काळांत मला कुणीं disturb केले तर स्फोट होतो. कुणीं आला तर मी अगदीं curtly वागून त्याला दोन मिनिटांतच जायला सुचवितो. मला disturbance सहन होत नाहीं.

**प्र.** :– लेखनाला वातावरणाचा खास आग्रह ?

**पे.** :– असतो तर ! माझें सारें लेखन घरींच व्हावें असा आग्रह असतो. निवांत वेळ, शांत असा बंगला दिला तरी माझें लेखन होणार नाहीं असें वाटतें. लंडनला मी होतो तेव्हां भरपूर वेळ होता. लंडन पाहून झाले होते. जागा चांगली होती. साधनें उपलब्ध होती– पण 'यशोदा' चें लेखन योजून ही मी करूं शकलो नाहीं. ही जागा, ती खुर्ची, ती एक विशिष्ट बैठक, तो दिवा व एकांत ह्या गोष्टी मला हव्या. तरच लेखनाची बैठक जमते. मला गोंगाट, गडबड चालत नाहीं.

**प्र.** :– मग वेळेचाही खास आग्रह असेलच कीं ?

**पे.** :– साधारणतः असतो. रात्रीं ९ चे पुढें लेखन चांगले होतें. ९ ते १२ ही वेळ मला मानवते. पण एकदां भोंवऱ्यांत सांपडलो कीं, मग मात्र साऱ्या वेळा सारख्याच असतात. मग वाटेल ती वेळ चालते.

**प्र.** :– लेखन पूर्ण झाल्यावर नेमकें काय वाटते ?

**पें.** :– खूप थकवा येतो. हलकं वाटतं. मग मी कधीं कधीं नुसताच पडून राहतो. कधीं मित्राकडे जातो खूप गप्पा मारतो. Happy mood मध्यें असतो. मनांत Suspense चा ताणही असतो. लोकांना हें लेखन कसे वाटेल ? आवडेल कीं, आवडणार नाहीं. असे अनेक प्रश्न समोर असतात. तरीही पण मी fresh असतो.

**प्र.** :– कांहीं अपुरे संकल्प ?

**पें.** :– नाहींत. संकल्प केले कीं, ते सिद्धीसच जावे लागतात. अपुरे संकल्प ठेवून पुढें जाणें मला जमत नाहीं. तें एक आव्हान आहे असें वाटतें. मग मी दोन वर्षे गेली तरी दुसरे कांहीं लिहिणार








# अभिनंदन ! पुन्हां अभिनंदन !! त्रिवार अभिनंदन !!!

# हे निवडून आले आहेत

प्रिय वाचक,

१९६५ च्या दिवाळी अंकांत 'हे उभे आहेत' ह्या शीर्षकाखालीं आपला कौल मागणारे एक कूपन देण्यांत आलें होते. त्यांत मला आवडलेली कथा । विनोदी लेख । कविता । परदेशी स्त्री । बिगचित्रे वगैरेंबाबतची आपली प्रतिक्रिया जाणून घेण्याचा हेतु होता. त्या योजनेला आपण जो सक्रिय पाठिंबा दिलांत त्याबद्दल आम्हीं प्रथमतः त्या स्पर्धेत भाग घेणाऱ्या वाचकांचे आभार मानतो. तसेंच ह्या स्पर्धेत जे वाचक यशस्वीपणें भाग घेऊं शकले त्या यशस्वी स्पर्धक वाचकांचे आम्हीं अभिनंदन करतो. अखेर आपला निर्णय हा 'आरसा' आहे असें आम्हीं म्हटले होते. चोखंदळपणें अंक वाचून आपण दिलेला निर्णय आम्हीं खालीं देत आहोंत. स्पर्धेबाबतचे नियम पूर्वी प्रसिद्ध केलेले आहेतच.

## हे निवडून आले आहेत

| | | | |
|---|---|---|---|
| (१) सर्वोत्तम कथा .............. | शिरीन ......... | पु. भा. भावे | १५१ मतें |
| (२) सर्वोत्तम विनोदी लेख .......... | हीं घरें, तीं घरें ..... | पु. ल. देशपांडे | २४३ मतें |
| (३) सर्वोत्तम 'परदेशी स्त्री' मालेंतील लेख.. | आस्वी ........ | सदानंद रेगे | १०५ मतें |
| (४) सर्वोत्तम चित्र .............. | नायिका ........... | दीनानाथ दलाल | ९० मतें |
| (५) सर्वोत्तम बिगचित्रे ........... | दीपावलीचा राजकीय नाट्योत्सव | | १५२ मतें |
| (६) सर्वोत्तम कविता ............. | अटकेवरती झेंडे .... | राजा बढे | १३८ मतें |

## बिनचूक विजेते

(१) श्री. एकनाथ गो. जोईल, सांताक्रूझ.
(२) श्री. मुकुंद अच्युत कोल्हटकर, मुंबई.
(३) श्री. रमाकांत व. पारकर, मुंबई.
(४) श्री. अशोक श्रीराम रानडे, मुंबई.

## एक चूक विजेते

(१) श्री. रत्नाकर ल. लवंदे, मुंबई ४.
(२) सुरेश एन्. वारघडे, पुणें २.
(३) कु. शशिकला एम्. रमडे, मुंबई ४.
(४) सौ. रत्नप्रभा बा. सावंत, मुंबई १५.
(५) शिवराम नामदेव बोंबे, मुंबई ८.
(६) सौ. लीला रामचंद्र भागवत, ठाणें.
(७) सौ. विजयाबाई वि. परब, वांद्रें.
(८) सौ. इंदिराबाई श्री. आपटे, माहीम.

## दोन चुका विजेते

(१) रमेश दीनानाथ बेताळे, पुणें.
(२) उषा दत्तात्रय गळंगे, बोरिवली.
(३) नारायण रा. हरळीकर, बडोदें.
(४) शंकर लक्ष्मण पेंडसे, कल्याण.
(५) प्रकाश भा. कामतीकर, जालना.
(६) कृष्णराव शं. देसाई, तासगांव.
(७) जगन्नाथ पां. तांडेल, वसई.
(८) सौ. शालिनी करमरकर, ठाणें.

'हे उभे आहेत' ह्या स्पर्धेत एकूण ३५७ वाचकांनीं भाग घेतला. पुष्कळांनीं आपलीं मतें पत्रांतच लिहून पाठविली, त्यांचा संपादन करून 'स. न. वि. वि.' ह्या सदरासाठीं उपयोग करण्यांत आला. **कूपन्सचाच फक्त सदर स्पर्धेत विचार करण्यांत आला आहे.** कूपन लहान झाल्यानें आपली गैरसोय झाल्याचें, तसेंच चित्रें, बिगचित्रे वगैरेंना एक ओळ दिल्यामुळें आपली पंचाइत झाल्याचें अनेकांनी निदर्शनास आणून दिलें आहे. मजकूर जातो म्हणूनहि कांहींना कूपन फाडून पाठवणें शक्य झालें नाहीं. त्या गैरसोयी मान्य करूनही ज्या स्पर्धकांनीं ह्या योजनेंत भाग घेतला त्या सर्व यशस्वी, अयशस्वी स्पर्धकांचे आम्हीं आभार मानतो. पुढें हा उपक्रम हातीं घेतांना आवश्यक त्या सुधारणा करण्याचेंही आम्हीं आश्वासन देतो.

यशस्वी लेखकांचे, स्पर्धकांचे आम्ही प्रकट अभिनंदन करतो.

**टीप:**—ज्या स्पर्धकांना आपले कूपन बिनचूक आहे असे खात्रीपूर्वक वाटत असेल त्यांनीं १० जानेवारी, १९६६ पर्यंत पत्राद्वारें कळवावें. नंतर आलेल्या तक्रारीचा विचार केला जाणार नाहीं. विजयी स्पर्धकांना बक्षीसाची रक्कम चेकनें १५ जानेवारी १९६६-पर्यंत रवाना केली जाईल. यासंबंधीं कोणताहि पत्रव्यवहार करूं नये.

—**व्यवस्थापक**








नाहीं. मला एक विषय सोडून देऊन दुसरें लेखनच हातीं घेतां येत नाहीं. अडलो कीं, मी थांबतो. विचार करतो. तो पूर्ण झाला कीं, पुन्हां लिहूं लागतो. त्यामुळें एकावेळीं एकच विचार अशी माझी पद्धत होऊन गेली आहे. (त्यावेळीं पेंडश्यांनीं दोन वर्षांपूर्वी हातीं घेतलेल्या एका लघु कादंबरीची हस्त-लिखितें मला दाखविली. ती पूर्ण करणें हाच त्यांचा आजचा संकल्प आहे– 'तो सिद्धीस जाईपर्यंत अन्य लेखन मी करूंच शकणार नाहीं–' पेंडश्यांची ही प्रकृतीही अभ्यास-विषय ठरावी.

**प्र.** :– पुष्कळशा लेखकांच्या वाङ्मय निर्मितीची सुरुवात कवितेनें झाली आहे. आपण कांहीं कविता लिहिल्यात?

**पें.** :– अहो, लेखन हाच मुळीं मला परका प्रांत होता.–मी व्यक्तिचित्रें लिहिलीं, ती वरी होती इतकेंच. पुढें लेखक होऊं हें स्वप्नांतही नव्हते. अजूनही तो मला एक चमत्कार वाटतो. त्यामुळें काव्य लेखन वगैरे कांहींच केलें नाहीं. तसें कधीं मनांतही आलें नाहीं.

**पं.** :– आपल्या वाङ्मयीन जडणघडणीस सहाय्यभूत झालेल्या व्यक्ति, ग्रंथ वा लेखक?

**पें.** :– खास असें कांहीं नाहीं. माझा मीच घडत गेलो. मीच विचार करीत गेलो. अनुभव खूप पचविले होते त्यांतून माझें वाङ्मय लिहिले गेले. त्या जीवनानुभवांशीं मी प्रामाणिक राहिलो व त्यांतूनच मी घडलो आहे असें मला वाटते. मी फार मोठे केले आहे असेंही मला वाटत नाहीं.

**प्र.** :– 'प्रादेशिक कादंबरी' असें कांहीं आपण मानतां काय? आपण 'प्रादेशिक कादंबरी' लिहितो आहोंत असें आपणांस वाटत होते काय?

**पें.** :– मी प्रादेशिक कादंबरी असें कांहीं मानीत नाहीं. मी त्या दृष्टीनें लेखन केलें नाहीं. नंतर लोक म्हणूं लागले. पण मला त्यांत दम वाटत नाहीं. Form of expression स्थलांवर अवलंबून असतो. भावना मूलभूत स्वरुपाच्या असतात, त्या बदलत नाहींत. राधा–बापू ही जोडी गारंबींत होती म्हणून त्यांची भावना त्या विशिष्ट प्रकारानें व्यक्त झाली आहे. मुंबईत ती असती तर त्यांचे स्वरूप–बाह्य फॉर्म बदलला असता. मूलभूत भावना मात्र तीच राहिली असती असें मला वाटतें. ●●●

---

## साभार पोंच

**अक्षरा**
ले. डॉ. रामचंद्र विळतकर
प्रकाशक–गोविंद विळतकर, ग्वाल्हेर.
मूल्य २ रु.

**टारफुला**
ले. शंकर पाटील
मराठी ग्रंथ संग्रहालय, मुं. १४.
मूल्य १० रु.

**नाटककार खाडिलकर**
ले. पु. रा. लेले
जोशी आणि लोखंडे, पुणें २.
मूल्य १० रु.

**पंचदशी**
ले. वसंत गांगल
महाराष्ट्र ग्रंथ भांडार, कोल्हापूर.
मूल्य ४ रु.

**आभाळाचा रंग निळा**
ले. ल. ग. जोश,
मकरंद साहित्य,
मूल्य ३ रु.

**मौज प्रकाशन**

**माझ्या आठवणी**
ले. पां. चि. पाटील.
मूल्य १५ रु.

**राजे मास्तर**
ले. श्री. ना. पेंडसे
मूल्य ३ रु.

**पालखी**
ले. दि. बा मोकाशी
मूल्य ५ रु.

**भाषा, इतिहास आणि भूगोल**
ले. ना. गो. कालेलकर
मूल्य ६–५० रु.

**रंगबावरी**
ले. इंदिरा संत
मूल्य ४–५० रु.

**मॅजेस्टिक बुक स्टॉल प्रकाशन**

**अणुगर्भातील अगाध शक्ति**
ले. डी. जे. ह्यूजेस,
अनु. प्रा. द. के. केळकर
मूल्य ४ रु.

**प्रपंच**
ले. शशी गणेश पटवर्धन
मूल्य ६ रु.

**लक्ष्मणरेषा**
ले. वि. वा. पत्की
मूल्य ६ रु.

**वाटचाल**
ले. प्रा. अनंत मनोहर
मूल्य ४ रु.

**पंखामधले गीत संपलें**
ले. अशोक चिटणीस
मूल्य ६ रु.

**तरीच जन्मा यावें**
ले. दा. वि. जोगळेकर
मूल्य ६ रु.

**सारे प्रवासी घडीचे**
ले. जयवंत दळवी
मूल्य ७–५० रु.

**नवरा म्हणूं नये आपला**
ले. शं. ना. नवरे
मूल्य २–५० रु.

**जादूचे अद्‌भुत प्रयोग**
ले. शि. शं. कार्लेकर
मूल्य ०–७५ रु.

**बाबासाहेब आंबेडकर**
ले. चांगदेव खैरमोडे
प्रताप प्रकाशन, मुं. ४.
मूल्य १२ रु.

**तेजस्विनी**
ले. कवि विहंग
महाराष्ट्र सरकार
मूल्य १ रु. ●●●

अनुक्रमणिका






